शब्दादिक बाह्य विषय बाहेर टाकून, भ्रुकुटीमध्यें दृष्टि स्थापन करून, व नासिकेच्या आंत संचार करणारे प्राणापान वायु एकत्र करून, इंद्रियें, मन व बुद्धि यांना आपल्या अधीन करून, आणि इच्छा, भय व क्रोध नाहींतशीं करून जो योगी मोक्षतत्पर असतो, तो सदा मुक्तच आहे. ॥ २७ ॥ २८ ॥

तर वैराग्याच्या आधारानें विषयांना बाहेर घालवून जे शरिराचे ठिकाणीं आपलें मन एकनिष्ठ करतात, ५१ इडापिंगला सोडून व सुषुम्नेमध्यें प्राण नेऊन, ललाटचक्रामध्यें स्वरूपाकडे दृष्टि माघारी फिरवून स्थिर करतात; ५२ डावी आणि उजवी नाकपुडी सोडून प्राण व अपान या वायूंस एक करून चित्ताला चिदाकाशांत नेतात; ५३ मग, रस्त्यावरील [बरें वाईट] सर्व प्रकारचें उदक घेऊन गंगा समुद्रास मिळाल्यावर ज्याप्रमाणें त्यांतून रस्त्यावरील उदक वगैरे वेगळें निवडितां येत नाहीं, ५४ त्याप्रमाणें, अर्जुना, ज्या वेळेस चिदाकाशांत मनाचा प्राणाच्या निरोधानें लय होतो, त्या वेळीं वासनांचा विचार आपोआप नाहींसा होतो. ५५ ज्या मनोरूप पटावर हें संसाररूपी चित्र उमटलेलें असतें, तो पट आपोआप फाटतो. ज्याप्रमाणें सरोवर आटल्यावर त्यांत प्रतिबिंब दिसत नाहीं, ५६ त्याप्रमाणें, जेथें मुद्दल मनच नाहींसें होतें, तेथें अहंकार इत्यादिक कोठून राहणार? म्हणूनच, ब्रह्मस्वरूपाचा अनुभव घेणारा शरिरासह ब्रह्मच होतो. ५७

सर्व यज्ञ व त्यांचा भोक्ता, सर्व लोकांचा महेश्वर व सर्व भूतांचा हितकर्ता, असा जो मी परमेश्वर, त्या मला जो जाणतो, तो शांतिसुखाप्रत प्राप्त होतो. ॥ २९ ॥

जिवंतपणींच कांहीं लोक ब्रह्म झाले म्हणून आम्हीं पूर्वी तुला सांगितलें, ते तरी या योगमार्गानें आले म्हणूनच; ५८ आणि म्हणूनच ते यमनियमरूपी योगमार्गाचे डोंगर व योगाभ्यासरूप सागर आक्रमून पार झाले; (ब्रह्मत्व पावले;) ५९ आणि त्यांनींच आपल्या स्वतांला उपाधिरहित करून प्रपंच अजमावला, म्हणून ते स्वतः खऱ्या ब्रह्माचें स्वस्वरूप बनून राहिले. १६० याप्रमाणें जेव्हां, श्रीकृष्णांनीं योगयुक्तीचा अभिप्राय प्रदर्शित केला, तेव्हां, अर्जुन मार्मिक होता म्हणून त्याला मोठा चमत्कार वाटला. ६१ हें पाहून कृष्ण त्याच्या मनांतील उद्देश जाणून हास्यवदनानें पार्थास म्हणाले, "मीं जें तुला सांगितलें, त्यामुळें तुझें मन कां बरें प्रसन्न झालें?" ६२ तेव्हां अर्जुन म्हणतो, "देवा, दुसऱ्याच्या मनांतील अभिप्राय जाणणारांचे तुम्हीं राजे आहां, यामुळें माझे मनांतील भाव तुम्हीं चांगला जाणला. ६३ देवा, मीं जें कांहीं तुम्हांस विचारपूर्वक पुसावें, तें तुम्हीं आधींच जाणलें; तर तुम्ही जें कांहीं म्हणतां, तें अधिक स्पष्ट करून सांगा. ६४ बाकी योगशास्त्राचा जो मार्ग तुम्हीं सांगितला, तो कसा आहे म्हणाल, तर खोल पाण्यांतून पोहून जाण्यापेक्षां पायउतार जसा सोपा असतो तसा आहे. ६५ त्याचप्रमाणें, ज्ञानयोगापेक्षां अष्टांगयोग आमच्यासारख्या निर्बळांना सुगम आहे; परंतु तो कांहीं काळाच्या अवधीनें साध्य होणार आहे. ६६ म्हणून, देवा, तो योग आणखी एक वेळ सांगावा. आतां अशानें विस्तार होईल खरा; पण तो साद्यंत सांगाच." ६७ तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, "होय का? तुला हा योगमार्ग चांगला आवडला आहे, तर तूं इतका घाबरा होऊं नको; तुला तो आम्ही सुखानें सांगतों; ऐक. ६८ अर्जुना, तूं ऐकतोस आणि त्याप्रमाणें आचरण करतोस; असें असतांना आम्हीं तुला सांगण्याची कमतरता कां करावी?" ६९ अगोदर आईचें चित्त, आणि त्यांत आवडत्या मुलाचें निमित्त झालें, तर त्या ठिकाणच्या स्नेहाचा अद्भुतपणा कोण जाणील! १७० त्या स्नेहाला, कारुण्यरसाची वृष्टि झाली, किंवा अद्भुत स्नेहाची सृष्टिच निर्माण झाली असें म्हटलें तरी चालेल; परंतु हें असो, भगवंताच्या कृपादृष्टीचें वर्णन करतां येत नाहीं. ७१ ती दृष्टि अमृताच्या मुशींतच ओतली किंवा प्रेम पिऊन उन्मत्त झाली, म्हणून अर्जुनाच्या मोहांत गुंतून तिला

जे अमृताची वोतली । कीं प्रेमचि पिकून मातली । म्हणोनि अर्जुनमोहें गुंतली । निघों नेणे ॥७२॥ हें बहु जें जें जल्पिजेल[1] । तेथें कथेसि फांकु[2] होईल । परि तें स्नेहरूपा न येल । बोलवरी ॥७३॥ म्हणोनि विसुरा[3] काय येणें । तो ईश्वरु कैवळावा[4] कवणें । जो आपुलें मानें[5] नेणे । आपणाचि ॥७४॥ तरी मागील ध्वनीआंतु[6] । मज गमला सावियाँ[7]ची मोहितु । जे बलात्कारें असे म्हणतु । परिस बापा ॥ ७५ ॥ अर्जुना जेणें जेणें भेदें[8] । तुझें का चित्त बोधें । तैसें तैसें विनोदें[9] । निरूपिजेल ॥७६॥ तो कींइसया नांव योगु । तयाचा कवण उपेगु[11] । अथवा अधिकारप्रसंगु । कवणा येथ ॥७७॥ ऐसें जें जें कांहीं । उक्त[12] असे इये ठाईं । तें आघवेंचि पाहीं । सांगेन आतां ॥७८॥ तूं चित्त देऊनि अवधारीं । ऐसें म्हणोनि श्रीहरी । बोलिजेल ते पुढारी । कथा आहे ॥७९॥ श्रीकृष्ण अर्जुनासी संगु[13] । नें[14] सांडोनि सांगेल योगु । तो व्यक्त[15] करूं प्रसंगु । म्हणे निवृत्तिदासु ॥१८०॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां पंमचोऽध्यायः ॥ ५ ॥ श्लोक २९, ओंव्या १८०.

१ जास्त बोलावें. २ विस्तार. ३ विचार. ४ जाणावा. ५ प्रमाण. ६ अभिप्राय. ७ सहज. ८ प्रकारानें. ९ कौतुकानें. १० काय. ११ उपयोग. १२ योग्य. १३ संबध १४ द्वैत कायम ठेऊन. १५ स्पष्ट.



बाहेर निघतां येईना. ७२ हिच्याबद्दल जों जों जास्त बोलावें, तों तों कथेचें विषयांतर होईल; तथापि श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या स्नेहाचें वर्णन शब्दानें बोलून करतां येणार नाहीं. ७३ ज्या ईश्वराला स्वतः आपलें माप करतां येत नाहीं, तो ईश्वर दुसऱ्या कोणीं जाणावा? म्हणून ह्या विचार करीत बसण्यांत काय अर्थ आहे? ७४ तरी मागें सांगितलेल्या अभिप्रायावरून मला असें वाटतें कीं, तो सहज मोहित होऊन बलात्कारानें अर्जुनाला असें म्हणाला कीं, "हे बापा, मी सांगतों तें ऐक. ७५ अर्जुना, ज्या ज्या प्रकारानें तुझ्या मनाला बोध होईल, त्या त्या प्रकारानें तुला कौतुकानें आम्ही हा योगमार्ग सांगूं. ७६ त्या योगाला काय म्हणतात, त्याचा उपयोग कोणता, आणि तो आचरण्यास अधिकारी कोण, ७७ असें जें जें कांहीं या संबंधानें योग्य असेल, तें सर्व आतां तुला आम्ही सांगतों, ७८ म्हणून तूं चित्त देऊन ऐक." असें बोलून श्रीहरींनीं जें कांहीं सांगितलें, ती कथा पुढें (पुढील अध्यायांत) आहे. ७९ निवृत्तिदास ज्ञानेश्वर म्हणतात कीं, द्वैत कायम ठेवून श्रीकृष्णांनीं अर्जुनाला जो योग सांगितला, तो आम्ही स्पष्ट करून सांगतों. १८०



# ज्ञानेश्वरी.

## अध्याय सहावा.

मग रायातें म्हणे संजयो । तोचि अभिप्राय अवधारिजो। श्रीकृष्ण सांगती आतां जो। योगरूप ॥१॥ सहजें ब्रह्मरसीचें पारणें। केलें अर्जुनालागीं नारायणें । कीं तेचि अवसरीं[2] पाहुणे। पातलों आम्ही ॥२॥ कैसी दैवाची थोरी नेणिजे । जैसें तान्हेलिया तोयें[3] सेविजे । कीं तेंचि चवी[4] करूनि पाहिजे । तंव अमृत आहे ॥३ तैसें आम्हां तुम्हां जाहलें । जें आडमुठीं[5] तत्त्व[6] फावलें[7] । तंव धृतराष्ट्रें म्हणितलें । हें न पुसों तूतें ॥४॥ तया संजया येणें बोलें । रायाचें हृदय चोजवलें । जे अवसरीं आहे घेतलें[10] । कुमरांचिया[11]॥५॥ हें जाणोनि मनीं हांसिला । म्हणे म्हातारा मोहें[12] नाशिला । येऱ्हवीं बोलु[13] तरी भला जाहला । अवसरीं[2] इये ॥६॥ परि तें तैसें कैसेनि होईल । जात्यंधा[14] कैसें पाहेल[15] । तेवींचि येरु[16] रोषु घेईल । म्हणोनि बिहे[17] ॥७॥ परि आपण चित्तीं आपुला । निकियापरी[18] संतोषला । जे तो संवादु फावला । श्रीकृष्णार्जुनांचा ॥८॥ तेणें आनंदाचेनि धालेपणें[19] । साभिप्राय[20] अंतःकरणें । आतां आदरेंसीं[21] बोलणें । घडेल तया ॥९॥ तो गीतेमाजि षष्ठीचा[22] । प्रसंगु असे आयणीचा[23]। जैसा क्षीरार्णवीं[24] अमृताचा। निवाडु[25] जाहला ॥१०॥ तैसें गीतार्थाचें सार । जें विवेकसिंधूचें पार[26] । नाना[27] योगविभवभांडार[28] । उघडलें कां॥११॥ जें आदिप्रकृतीचें[29] विसावणें[30] । जें शब्दब्रह्मासि[31] न[32] बोलणें । जेथूनि गीतावल्लीचें[33] ठाणें[34] प्रोरोहो[35] पावे ॥१२॥ तो अध्याय सहावा । वरि साहित्याचिया[36] बरवा । सांगिजेल म्हणोनि परिसावा। चित्त देउनी॥१३॥ माझा मराठाचि[37] बोलु कौतुकें। परि अमृतातेंही पैजा[38] जिंके। ऐशीं अक्षरें रसिकें[39]। मेळवीन॥१४॥ जिये कोवळिकेचेनि[40] पाडें। दिसती नादींचे[41] रंगी[42] थोडे। वेधें[43] परिमळाचें[44] बीकें[45] मोडे। जयाचेनि॥१५॥ ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणींचि होती जिभा । बोलें इंद्रियां लागे कळंभा[46] । एकमेकां ॥१६॥ सहजें शब्दु तरी विषो श्रवणाचा । परि रसना[47] म्हणे रसु हा आमुचा । घ्राणासि भावो जाय परिमळाचा । हा तोचि[48] होईल ॥१७॥ नवल बोलतीये रेखेची[49] वाहणी[50] । देखतां डोळा पुरों लागे धणी[51] । ते म्हणती उघडली खाणी । रूपाची हे ॥१८॥ जेथ संपूर्ण पदें[52] उभारे । तेथ मनचि धांवे बाहिरें । बोलु भुजाही आविष्करें[53]। आलिंगावया ॥१९॥ ऐशीं इंद्रियें आपुलालिया भावीं[54] । झोंबती परि तो सरिसेपणेंचि[55] बुझावी[56] । जैसा एकला जग चेववी[57] । सहस्रकरु[58] ॥२०॥ तैसें

१ आत्मानात्मज्ञानरसाचें. २ समयां ३ पाणी. ४ चाखून. ५ आडगिऱ्हाइकी. ६ ब्रह्म. ७ प्राप्त झालें. ८ जाणवलें. ९ बाधेनें. १० उत्कंठित झालें आहे. ११ पुत्रांची चांगली हकीकत. १२ पुत्रवात्सल्यानें. १३ मागील कथा. १४ जन्मांधाला. १५ दिसेल. १६ हा धृतराष्ट्र. १७ भ्याला. १८ उत्तम प्रकारें. १९ तृप्तीनें. २० प्रफुल्लित. २१ अदबीनें. २२ सहाव्या अध्यायाचा. २३ चतुरपणाचा. २४ क्षीरसागराचें मंथन करतांना २५ प्राप्ति. २६ पैलथडी. २७ अथवा. २८ योगसंपत्तीचा जामदारखाना. २९ आदिमायेचें. ३० विश्रांतिस्थान. ३१ वेदाला. ३२ मौन. ३३ गीतारूप वेलीचें. ३४ स्वरूप. ३५ अंकुर. ३६ सर्व कौशल्याच्या उपसंहारासहित. ३७ प्राकृत;साधा ३८ प्रतिज्ञेनें. ३९ गोड. ४० कोंवळेपणाच्या तुलनेनें. ४१ सप्त सुरांचे ४२ आनंद. ४३ छंदानें. ४४ सुवासाचे. ४५ बळ. ४६ कलह. ४७ जीभ. ४८ वासच. ४९ कवित्वाची. ५० पद्धत. ५१ तृप्ति. ५२ वाक्य. ५३ प्रगटे, धावे. ५४ स्वभावाचे ५५ सारखेपणें. ५६ बोध करी. ५७ वागवितो. ५८ सूर्य.

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय सहावा.

मग संजय धृतराष्ट्रास म्हणाला, " राजा, आतां, श्रीकृष्णांनीं योगाबद्दल जो आपला अभिप्राय सांगितला, तो ऐक. १ नारायणांनीं अर्जुनाला सहज ज्ञानरसाचें पारणें केलें, तों तेच वेळीं आम्ही तेथें पाहुणे म्हणून गेलों होतों. २ दैवाची थोरवी काय वर्णावी? तहान लागलेल्या मनुष्यानें पाणी पिण्याकरितां म्हणून पाण्याचें भांडें तोंडीं लावावें, व त्याची चव घेतांच पाण्याचे ऐवजीं त्याला ज्याप्रमाणें अमृतच मिळावें, ३ त्याचप्रमाणें, राजा, एखादी आडगि-ह्राइकी मूल्यवान वस्तु थोडक्यांत प्राप्त होते, त्याप्रमाणें मला व तुला ब्रह्माची प्राप्ति झाली." परंतु धृतराष्ट्र संजयाला म्हणाला कीं, " तुला ब्रह्मरसाबद्दल मी कांहीं विचारीत नाहीं! " ४ हें ऐकून, धृतराष्ट्र राजाचें मन पुत्रांची चांगली हकीकत ऐकण्याविषयीं उत्कंठित झालें आहे असें संजयानें जाणलें; ५ व हें जाणून तो मनांत विस्मय पावला आणि म्हणाला, "हा वृद्ध धृतराष्ट्र पुत्रवात्सल्यानें अगदीं वेडावला आहे; येरवीं येथपर्यंतचा कृष्णार्जुनांचा संवाद अति उत्तम झाला. ६ परंतु या संवादाची गोडी याला कोठून लागणार? कारण, जो जन्मांध आहे त्याला कसें दिसेल? परंतु त्याला असें स्पष्ट जर बोलावें, तर राग येईल, म्हणून संजय भीतीनें स्पष्ट बोलला नाहीं. ७ तथापि श्रीकृष्णार्जुनांच्या परस्पर संवादापासून तो आपल्या मनांत उत्तम प्रकारें संतोषित झाला. ८ ह्या आनंदाच्या तृप्तीनें व प्रफुल्लित अंतःकरणानें तो आतां मोठ्या अदबीनें धृतराष्ट्राला अभिप्राय सांगेल. ९ क्षीरसागराचें मंथन करतांना जशी अमृताची प्राप्ति झाली, तसा तो अभिप्राय म्हणजे गीतेंतील सहाव्या अध्यायाचा योगरूप अभिप्राय होय; व तो बुद्धीनें जाणला पाहिजे. १० तो अध्याय गीतेंतील सार होय, व आत्मनात्मविचाररूपी समुद्राची पैलथडी होय अथवा, जणू काय योगसंपत्तीचा जामदारखानाच उघडला आहे ११ जें आदिमायेचें विश्रांतिस्थान, व ज्या ठिकाणीं वेदांनाही मौन धारण करावें लागतें, आणि ज्यापासून गीतारूप वेलीला अंकुर फुटला, १२ तो हा सहावा अध्याय सर्व अलंकारानें सांगितला जाईल, म्हणून चित्त देऊन ऐका. १३ माझे बोल शुद्ध प्राकृत आहेत खरे; परंतु ते प्रतिज्ञेनें सहज अमृतालाही जिंकतील अशा गोड अक्षरांनीं मी सांगेन. १४ त्या बोलांच्या मृदुपणानें, सप्तस्वरांपासून होणारा आनंदही कमी असा भासेल, किंवा त्यांच्या छंदानें सुवासही कमीपणा पावेल. १५ पहा कीं, गोडीच्या आशेनें कानालाच जिव्हा फुटतील, व इंद्रियें आपआपसांत कलह करूं लागतील. १६ मूळ शब्द विषय म्हटला म्हणजे कानांचा होय; परंतु जीभ हा रस आमचा आहे असें म्हणेल, व नाकालाही या शब्दापासून सुगंधाचा भास होईल. १७ यापेक्षां आणखी नवल कोणतें? कीं बोलण्याची नुसती सरणी पाहून डोळे तृप्त होतील; आणि त्यांना असें वाटूं लागेल कीं, हे बोल नसून ही प्रत्यक्ष रूपाची खाणच निर्माण झाली आहे! १८ जेव्हां शब्द जुळून संपूर्ण वाक्य बाहेर पडेल, तेव्हां मन हें बाहेर निघेल; आणि आपले बाहु उभारून त्या वाक्याला आलिंगन देण्याला धावेल. १९ याप्रमाणें सर्व इंद्रियें आपापल्या धर्माप्रमाणें त्या बोलाला झोंबतील, परंतु तो सगळ्यांना सारखेपणानें बोध करील. ज्याप्रमाणें एकटा सूर्य सर्व जगाला वागवितो, २० त्या-

शब्दाचें व्यापकपण । देखिजे [1]असाधारण । पाहातयां [2]भावज्ञां [3]फावती गुण । चिंतामणीचे ॥२१॥ हें असो सया बोलांचीं ताटें भलीं । वरी [4]कैवल्यरसें [5]वोगरेलीं । हीं [6]प्रतिपत्ति मियां केली । निष्कामासी ॥२२॥ आतां [7]आत्मप्रभा नित्य नवी । तेचि करूनि [8]ठाणदिवी । जो इंद्रियांतें चोरूनि जेवी । तयासीचि [9]फावे ॥२३॥ येथ श्रवणाचेनि पांगें-[10] । वीण[11] श्रोतयां व्हावें लागे । हे मनाचेनि[12] निजांगें । भोगिजे गा॥२४॥ [13]आहाच बोलाची [14]वालीफ फेडिजे । आणि ब्रह्माचि याचि आंगा [15]घडिजे । मग सुखेंसीं [16]सुरवाडिजे । सुखाचिमाजि ॥२५॥ ऐसें [17]हळुवारपण जरी येईल । तरीच हें [18]उपेगा जाईल । येऱ्हवीं आघवी गोष्टी होईल । मुकया बहिरयाची ॥२६॥ परि तें असो आतां आघवें । नलगे श्रोतयांतें [19]कडसावें । जे अधिकारिये एथ स्वभावें । [20]निष्कामकामु ॥२७॥ जिहीं आत्मबोधाचिया आवडी । केली स्वर्गसंसाराची [21]कुरोंडी । तेवांचूनि एथिंची गोडी । नेणती आणिक ॥२८॥ जैसा [22]वायसीं चंद्र नोळखिजे । तैसा प्राकृतीं ग्रंथु हा नेणिजे । आणि तो हिमांशुचि[23] जेविं [24]खाजें । चकोराचें ॥ २९ ॥ तैसा सज्ञानासी तरी हा ठावो । आणि अज्ञानासी [25]आन गांवो । म्हणोनि बोलावया विषय पहाहो । विशेषु नाहीं ॥३०॥ परि [26]अनुवादलों मी प्रसंगें । तें सज्जनीं [27]उपसाहावें लागे । आतां सांगेन काय श्रीरंगें । निरोपिलें जे ॥३१॥ तें बुद्धीही [28]आकळितां सांकडें[29] । म्हणऊनि बोलीं विपायें[30] सांपडे । परि श्रीनिवृत्तिकृपादीप उजियेडें । देखेन मी ॥३२॥ जें दिठीही[31] न पविजे । तें दिठीवीण देखिजे । जरी [32]अतींद्रिय [33]लाहिजे । [34]ज्ञानबळ ॥३३॥ नातरी जें [35]धातुवादाही न जोडे । तें लोहींचि [36]पंधरें सांपडे । जरी दैवयोगें चडे । परिसु हाता ॥३४॥ तैसी सद्गुरुकृपा होये । तरी करितां काय [37]आपु नोहे । म्हणऊनि ते[38] अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ॥३५॥ तेणें कारणें मी बोलेन । बोलीं [39]अरूपाचें रूप दावीन । अतींद्रिय परि भोगवीन । इंद्रियांकरवीं ॥३६॥ आइका यश श्री औदार्य । ज्ञान वैराग्य ऐश्वर्य । हे साही गुणवर्य । वसती जेथ ॥३७॥ म्हणोनि तो [40]भगवंतु । जो निःसंगाचा [41]सांगातु । तो म्हणे पार्था [42]दत्तचित्तु । होईं आतां ॥३८॥

श्रीभगवानुवाच:—

**अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।**
**स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः॥१॥**

**अन्वयः**—यः कर्मफलं अनाश्रितः [ सन् ] कार्यं कर्म करोति, सः [ अपि ] संन्यासी च योगी [ भवति; केवलं ] निरग्निः आक्रियः च न. ॥ १ ॥

आइकें [43]योगी आणि संन्यासी[44] जनीं । हे एकचि सिनानें[45] [46]झणीं मानीं । येऱ्हवीं विचारिजती जंव दोन्ही । तंव एकचि ते ॥३९॥ सांडिजे दुजया नामाचा [47]आभासु । तरी योगु तोचि संन्यासु । पाहातां ब्रह्मीं नाहीं [48]अवकाशु । दोहींमाजीं॥४०॥ जैसें नामाचेनि [49]अनारिसेपणें । एका पुरुषातें बोलावणें । कां दोहीं मार्गीं जाणें । एकाचि ठाया ॥४१॥ नातरी एकचि उदक सहजें । परि सिनाना घटीं भरिजे । तैसें भिन्नत्व जाणिजे । योगसंन्यासांचें ॥४२॥ आइकें सकळ संमतें जगीं । अर्जुना पाहें गा तोचि योगी । जो कर्में करूनि [50]रागी । नोहेचि फळीं ॥४३॥ जैसी मही हे उद्भिज्जें[51] । [52]जनी अहंबुद्धीवीण सहजें । आणि तेथिंचीं तियें बीजें । अपेक्षीना[53] ॥४४॥ तैसा [54]अन्वयाचेनि

१ विशेष. २ अर्थ जाणणारांस. ३ आढळतात. ४ मोक्षरसानें. ५ वाढलीं. ६ मेजवानी; (ग्रंथरचना.) ७ आत्मज्योति. ८ ठाणवई. ९ लाभे. १० गरज, कमीपणा. ११ न करितां. १२ मनापासून. १३ उगीच. १४ त्वचा. १५ व्हावें. १६ उपभोग घ्यावा. १७ नम्रपणा. १८ उपयोगास. १९ सावध करावें. २० कर्मफलांविषयीं निरिच्छ. २१ ओंवाळणी. २२ कावळ्यांनीं. २३ चंद्र. २४ खाद्य. २५ दुसरा. २६ बोललों. २७ क्षमा करावी. २८ कळण्यास. २९ कठिण. ३० कदाचित्. ३१ दृष्टीस. ३२ इंद्रियातीत. ३३ मिळेल. ३४ ब्रह्मज्ञान. ३५ किमयागारास. ३६ पंधराच्या दराचें उत्तम सोनें. ३७ प्राप्त. ३८ सद्गुरुकृपा. ३९ निराकाराचें. ४० भग=यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य हा गुणसमुदाय—त्यानें युक्त. ४१ सोबती. ४२ लक्ष दिलेला. ४३ फलेच्छा नसून कर्माचरण करणारे. ४४ सर्वसंगपरित्याग करणारे. ४५ वेगळे. ४६ नको. ४७ आरोप. ४८ भेद. ४९ वेगळेपणानें. ५० इच्छायुक्त. ५१ उद्भिज्ज. (वृक्षादिक.) ५२ उत्पन्न करिते. ५३ इच्छा करीत नाहीं. ५४ आत्मबोधाच्या.

प्रमाणें शब्दांचा व्यापकपणा अलौकिक आहे असें समजा; आणि पाहूं गेलें असतां, जो त्यांचा अर्थ जाणणारा आहे, त्याला त्यांचे ठिकाणीं चिंतामणीचे गुण आढळून येतात. २१ हें असो; त्या बोलांचीं मोठालीं ताटें बनवून व त्यांत मोक्षरस वाढून, निष्कामी जनांना ही ग्रंथरूपी मेजवानीच केली आहे. २२ या मेजवानींत उजेडाकरितां नित्य नवी अशी आत्मज्योतीची ठाणवई करून, त्या उजेडांत जो इंद्रियांना न कळत मेजवानीचें सेवन करील, त्यालाच तिची प्राप्ति होईल. २३ या ठिकाणीं श्रवणाचा कमीपणा न करितां श्रोत्यांनीं मनानेंच उपभोग घ्यावा. २४ बोलावरची नुसती साल अगोदर काढून टाकावी, आणि ब्रह्मस्वरूप होऊन मग सुखानेंच सुखाची गोडी घ्यावी. २५ जर अशा सूक्ष्म मनानें वागलें, तरच त्याचा उपयोग होईल; नाहीं तर सर्व गोष्टी मुक्यानें बोलून बहिऱ्यानें ऐकल्याप्रमाणें होतील. २६ परंतु ही गोष्ट आतां राहूं द्या. कां कीं, सर्व श्रोत्यांना सावध करण्याची गरज नाही. कारण, या ठिकाणीं, ज्यांना स्वभावतांच विषयांची वासना नाहीं, तेच ही गोष्ट ऐकण्यास अधिकारी आहेत. २७ ज्यांनीं ब्रह्मज्ञानाच्या आवडीकरितां स्वर्ग आणि संसार यांच्या प्राप्तीची ओंवाळणी केली आहे, त्यांच्याशिवाय इतरांना या बोलाची गोडी कळणार नाहीं. २८ कावळ्यांला जशी चंद्राची ओळख नाहीं, तशी या गीता ग्रंथाची प्राकृत जनांना ओळख नाहीं; परंतु तोच चंद्र जसा चकोराचें खाद्य आहे, [तद्वत्, कर्माच्या फलांची ज्यांना आशा नाहीं त्यांनाच या गीता ग्रंथाची ओळख आहे.] २९ तसेंच, जे ज्ञानी आहेत, त्यांना हा ग्रंथ म्हणजे विश्रांतीचें ठिकाण आहे; आणि जे अज्ञानी आहेत, त्यांना परक्या गांवाप्रमाणें आहे. म्हणून या विषयाबद्दल विशेष बोलण्याचें कारण नाहीं. ३० परंतु प्रसंगानुसार मी जें बोललों, त्याची सज्जनांनीं मला क्षमा करावी. यापुढें, श्रीरंगांनीं जें काय सांगितलें आहे तें मी सांगेन. ३१ तें बोलणें बुद्धीलाही कळण्याला कठिण आहे, म्हणून माझ्या सांगण्यांत कदाचित् आलें तर येईल; परंतु श्रीगुरु निवृत्ति महाराजांच्या कृपारूप दीपाच्या उजेडानें मी तें जाणून बोलेन. ३२ इंद्रियातीत असें जें ब्रह्मज्ञान, तें जर प्राप्त झालें, तर जी गोष्ट दृष्टीस न पडणारी ती दृष्टीशिवाय दिसेल. ३३ जर दैवयोगानें हातास परीस लागला, तर किमयागारासही जें न मिळणारें तें सोनें लोखंडांत सांपडतें; ३४ तसें, जर सद्गुरूची कृपा होईल, तर प्रयत्न केला असतां काय प्राप्त होणार नाहीं? म्हणून, ज्ञानदेव म्हणतात, अशी जी सद्गुरुकृपा, ती मजवर पूर्ण आहे. ३५ त्या योगानें मी बोलेन, आणि माझ्या बोलण्यांत निराकार वस्तु सर्वांस प्राप्त करून देईन; आणि जी वस्तु इंद्रियातीत आहे, ती इंद्रियांकडून भोगवीन. ३६ पहा—यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य आणि ऐश्वर्य हे सहा गुण ज्याचे ठिकाणीं वास करतात, ३७ म्हणून त्याला भगवान असें म्हणतात; व ज्यांनीं सर्वसंगपरित्याग केला आहे त्यांचा जो मित्र, तो पार्थास असें म्हणाला कीं, आतां लक्ष देऊन ऐक. ३८

**श्रीभगवान म्हणाले:—जो अग्निसेवा व विहित कर्में करीत नाहीं, तोच केवळ संन्यासी व योगी असें नव्हे; तर जो कर्मांचे फलाची इच्छा न करितां विहित कर्में करितो, तोही संन्यासी व योगी होय. ॥ १ ॥**

श्रीकृष्ण म्हणतात:—पार्था, हें पहा—योगी आणि संन्यासी हे या जगांत एकच आहेत. ते वेगळे आहेत असें मानू नको. कारण, या दोहोंचा विचार केल्यावर ते एकच आहेत. ३९ त्यांच्यावर दोन नांवांचा जो आरोप आहे, तो सोड. कारण, ब्रह्मदृष्टीनें पाहूं गेलें असतां या दोहोंत भेद नाहीं, म्हणून योग तोच संन्यास होय. ४० जसा नांवाच्या वेगळेपणानें एकाच पुरुषाला हांका मारणें किंवा एकाच ठिकाणाला दोन मार्ग जाणें; ४१ किंवा एकच उदक दोन भांड्यांत भरल्यावर पाण्याला जसा दुजा भाव नाहीं, तसा योग आणि संन्यास यांत भेद नाहीं असें जाण. ४२ अर्जुना, जो कर्में करून त्यांच्या फलांची इच्छा धरीत नाहीं, तोच या जगतांत सर्वांच्या बुद्धीनें योगी असा समजला जातो. ४३ पृथ्वी ही वृक्षादिकांना उत्पन्न करून त्यांच्या उत्पत्तीबद्दल कांहींच अहंकारबुद्धि दाखवीत नाहीं; आणि त्यांच्यापासून उत्पन्न होणाऱ्या फलांचीही ज्याप्रमाणें इच्छा करीत नाहीं, ४४ त्याचप्रमाणें, आत्मबोधाच्या आधारानें आणि जातीस

आधारें । जातीचेनि अनुकारें[1] । जें जेणें अवसरें । करणें पावे ॥४५॥ तें तैसेंचि उचितें[2] करी । परी साटोपु[3] नोहे शरीरीं । आणि बुद्धिही करोनि फळवेरीं[4] । जायेचिना ॥४६॥ ऐसा तोचि संन्यासी। पार्था गा परियेसीं । तोचि भरंवसेनिसीं । योगीश्वरु ॥४७॥ वांचूनि उचित कर्म प्रासंगिक[5] । तयातें म्हणे हें सांडावें बद्धक[6] । तरी टांकोटांकीं[7] आणिक एक । मांडीचि तो ॥४८॥ जैसा क्षाळूनियां[8] लेपु एकु । सवेंचि लाविजे आणिकु । तैसेनि आग्रहाचा पांइकु[9] । विचंबे[10] वायां ॥४९॥ गृहस्थाश्रमाचें वोझें । कपाळीं आधींचि आहे सहजें । कीं तोचि संन्यासासवां ठेविजे । सरिसें पुढती[11] ॥५०॥ म्हणूनि अग्निसेवा[12] न सांडितां । कर्माची रेखा[13] नोलांडितां[14] । आहे योगसुख स्वभावता । आपणपांचि ॥५१॥

**यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव ।**
**न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन २**

**अन्वयः**—पांडव, [पंडिताः] यं संन्यासमिति प्राहुः तं योगं विद्धि; असंन्यस्तसंकल्पः कश्चन योगी न भवति हि. ॥२॥

ऐकें संन्यासी तोचि योगी । ऐसी एकवाक्यतेची जगीं । गुढी उभविली अनेगीं[15] । शास्त्रांतरीं ॥५२॥ जेथ संन्यासिला[16] संकल्पु तुटे । तेथचि योगाचें सार[17] भेटे । ऐसें हें अनुभवाचेनि धटें[18] । साचें जया ॥५३॥

**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।**
**योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥३॥**

**अन्वयः**—योगम् आरुरुक्षोः मुनेः कर्म कारणम् उच्यते, योगारूढस्य तस्यैव शमः कारणम् उच्यते. ॥ ३ ॥

आतां योगाचळाचा[19] निमथा[20] । जरी ठाकावा[21] आथि पार्था । तरी सोपानीं[22] या कर्मपथा । चुका झणीं[23] ॥५४॥ येणें यमनियमांचे तळवटें । रिगे आसनाचिये पाउलवाटें । येई प्राणायामाचेनि आडकाठें[24] । वरौता[25] ॥५५॥ मग प्रत्याहाराचा[26] आंधाडा[27] । जो बुद्धीचियाहि पायां निसरडा । जेथ हडिये[28] सांडिती होडा[29] । कडेलग[30] ॥५६॥ तरी अभ्यासाचेनि बळें । प्रत्याहारीं निरोळें[31] । नखीं[32] लागेल ढोळढाळें[33] वैराग्याची ॥५७॥ ऐसा पवनाचेनि पाठारें[34] । येतां धारणेचेनि[35] पैसारें । क्रमी ध्यानाचें चवरें[36] । सांपडे तंव ॥५८॥ मग तया मार्गाची धांव । पुरेल प्रवृत्तीची हांव[37] । जेथ साध्यासाधना खेंव[38] । समरसें[39] होय ॥५९॥ जेथ पुढील पैस[40] पारुखे[41] । मागील स्मरावें तें ठाके[42] । ऐसिये सरिसीये[43] भूमिके । समाधि राहे ॥६०॥ येणें उपायें योगारूढु । जो निरवधि[44] जाहला प्रौढु[45] । तयाचिया चिन्हांचा निर्वाडु[46] । सांगेन आइकें ॥ ६१ ॥

**यदा हि नेंद्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।**
**सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥४॥**

**अन्वयः**—यदा इंद्रियार्थेषु च कर्मसु न अनुषज्जते, च सर्वसंकल्पसंन्यासी [भवति], तदा योगारूढः उच्यते.॥४॥

तरी जयाचिया इंद्रियांचिया घरा। नाहीं विषयांचिया येरझारा । जो आत्मबोधाच्या वोवरीं[47] । पहुडला[48] असे ॥६२॥ जयाचें सुखदुःखाचेनि आंगें । झगटलें[49] मानस चेवो[50] नेघे । विषय पासींही आलियां से[51] न रिघे । हें काय म्हणऊनि ॥६३॥ इंद्रियें कर्माच्या ठायीं । वाढीनलीं परि केहीं[52] । फळहेतूची चाड[53] नाहीं । अंतःकरणीं ॥६४॥ असतेनि[54] देहें एतुला[55] । जो चेतुचि[56] दिसे निदेला । तोचि योगारूढु भला । वोळखें तूं ॥६५॥ तेथ अर्जुन म्हणे अनंता । हें मज विस्मो[57] बहु आइकतां । सांगें तया ऐसी योग्यता । कवणें दीजे ॥६६॥

**उद्धरेदात्मनात्मानंनात्मानमवसादयेत् ।**
**आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥५॥**

---

१ अनुरूप. २ यथाविधि. ३ अहंकार. ४ फलाच्या आशेकडे. ५ नित्यनैमित्तिक. ६ जन्ममरण देणारे. ७ लागलीच. ८ धुऊन. ९ नौकर, अधीन झालेला. १० घोंटाळतो. ११ पुनः १२ श्रौत-स्मार्त होमादिक कर्में. १३ मर्यादा. १४ न टाकतां. १५ बहुतांनीं. १६ सोडलेला. १७ ब्रह्म. १८ मापानें. १९ कर्मरूप पर्वताचा. २० मस्तक. २१ चढावा. २२ जिना. २३ नको. २४ कड्यानें. २५ वर. २६ विषयांपासून इंद्रियें मागें ओढणें. २७ अर्धा तुटलेला कडा. २८ हठयोगी. २९ प्रतिज्ञा. ३० पराकाष्ठेच्या. ३१ निराधार आकाश. ३२ प्रवेश. ३३ हळू हळू. ३४ पाठाळ. ३५ चित्त स्थिर करण्याचा मार्ग. ३६ मस्तक. ३७ इच्छा. ३८ भेट. ३९ ऐक्यानें. ४० पाऊल. ४१ बंद होतें. ४२ बंद पडतें. ४३ सम. ४४ अत्यंत. ४५ परिपूर्ण. ४६ निर्णय. ४७ स्वयंपाकघरांत. ४८ निजला. ४९ शिणलेलें. ५० जागें होत नाहीं. ५१ स्मरण. ५२ कधीं. ५३ इच्छा. ५४ विद्यमान. ५५ एवढा ५६ जागा असतां. ५७ नवल.

अनुरूप असें ज्या ज्या वेळेस जें जें करणें पडेल, ४५ तें तें सर्व यथाविधि करून तो आपल्या शरिरांत अहंकार उत्पन्न होऊं देत नाहीं, आणि बुद्धीला फळाच्या आशेकडे जाऊं देत नाहीं. ४६ पार्था, ऐक. असा जो पुरुष, तोच संन्यासी, आणि तोच निःसंशय योगीश्वर होय. ४७ या हातोटीशिवाय, जो कोणी, नित्यनैमित्तिक कर्मे बद्धक आहेत असें समजून त्यांचा त्याग करतो, आणि लागलीच दुसरीं कर्मे करण्यास प्रवृत्त होतो, ४८ तो, एक लेप धुऊन टाकून दुसरा लेप लावण्याच्या आग्रहाचे स्वाधीन झालेल्या मनुष्याप्रमाणें उगीच घोटाळ्यांत पडतो. ४९ गृहस्थाश्रमाचें ओझें सर्वांच्या कपाळीं अगोदर सहजांच लागलें आहे; परंतु गृहस्थाश्रमाचें आचरण यथाविधि न करितां संन्यास घेऊन पहिलें ओझें टाकून लगेच दुसरें ओझें डोक्यावर घेतो. ५० म्हणून, श्रौत-स्मार्त होमादिक कर्मांचें यथाविधि आचरण न टाकतां कर्मांची मर्यादा ओलांडली नाहीं, तर आपल्याजवळच सहजानुसार योगसुख आहे. ५१

**हे अर्जुना, ज्ञाते ज्याला संन्यास असें म्हणतात, तोच योग असें तूं समज. कारण, संकल्पत्यागावांचून कोणीही योगी होत नाहीं. २**

एक–'संन्यासी तोच योगी' असा एकवाक्यतेचा ध्वज अनेक शास्त्रांनीं या जगांत उभारला आहे. ५२ ज्या ठिकाणीं सोडलेला संकल्प नाहींसा होतो, त्याच ठिकाणीं, योगाचें सार जें ब्रह्म त्याची भेट होते, असें अनुभवाअंतीं ठरलें आहे. ५३

**ज्या मुनीला ध्यानयोग प्राप्त करून घ्यावयाचा आहे, त्याला विहित कर्मांचें आचरण हेंच साधन होय; व योग प्राप्त झाल्यावर तो पूर्णत्वास येण्याला कर्मनिवृत्ति हें साधन होय ३**

पार्था, योगरूप पर्वताच्या माथ्यावर ज्याला जाण्याची इच्छा असेल, त्यानें कर्ममार्ग हा सोपा जिना सोडतां कामा नये. ५४ या कर्ममार्गानें जावयास लागलें, म्हणजे पहिल्यानें या पर्वताचा यमनियमरूपी तळ लागतो; नंतर आसनांच्या पाऊल वाटेनें प्राणायामरूप कड्यानें वर जावें लागतें; ५५ नंतर, प्रत्याहार हाच कोणी अर्धा तुटलेला कडा लागतो. त्याच्यावरून बुद्धीचेही पाय निसरतात; आणि तो ओलांडतांना हठयोग्यांच्या सुद्धां पराकाष्ठेच्या प्रतिज्ञा शेवटास जात नाहींत. ५६ तथापि अभ्यासाच्या बळानें प्रत्याहाररूप निराधार आकाशांत फक्त वैराग्यच हळूहळू चढूं शकतें. ५७ अशा रीतीनें वायुरूप घोड्यावरून मार्ग क्रमीत असतां चित्त स्थिर करण्याचा मार्ग क्रमूं लागल्यावर तो ध्यानाच्या माथ्यावर येऊन पोहोंचतो. ५८ मग त्याचें मार्ग चालणें बंद पडतें, व मनाचीही हांव बंद होते; आणि ब्रह्माशीं ऐक्य झाल्यामुळें साध्यसाधन भेद नाहींसा होतो. ५९ ज्या ठिकाणीं पुढील पाऊल टाकणें बंद होऊन मागीलही आठवण रहात नाहीं, अशा सम–अविकार भूमीवर समाधि लागतो. ६० या उपायानें जो योगारूढ होतो, तो निःसंशय परिपूर्ण झाला. आतां त्याच्या चिन्हांचा निर्णय तुला सांगतों, तो ऐक. ६१

**जेव्हां योगी विषयांचे ठिकाणीं व कर्मांचे ठिकाणीं सक्त होत नाहीं, आणि सर्व संकल्प टाकून देतो, तेव्हां त्याला योगारूढ असें म्हणतात. ॥ ४ ॥**

हें पहा—जो आत्मबोधाच्या घरांत निजलेला असतो, (ज्याला आत्मज्ञान झालेलें असतें,) त्याच्या इंद्रियांच्या घरीं विषयांचें येणें जाणें बंद होतें. (त्याच्यावर इंद्रियांचा पगडा बसत नाहीं.) ६२ संसारांतील सुखदुःखांशीं झगडतांना टकरा देऊन ज्याचें मन बिटल्यामुळें प्रोत्साहन पावत नाहीं, त्याच्याजवळ जरी विषय [मूर्तिमंत] येऊन उभे राहिले, तरी ते कोण आहेत ह्याबद्दल त्याला स्मृतिही नसते. ६३ कदाचित् इंद्रियें कर्म करण्याला प्रवृत्त झालीं, तरी त्याला अंतःकरणांत फळाच्या हेतूची इच्छा नसते. ६४ जो देही जागा असतां निजलेला दिसतो, त्यालाच खरा योग साध्य झाला असें तूं ओळख. ६५ त्या वेळेस अर्जुन अनंतास म्हणतो, "देवा, तुम्ही जें सांगतां, तें ऐकून मला नवल वाटतें; तर त्या योग्याला अशी योग्यता कोण देतो हें मला सांगा." ६६

**आपण आपल्या आत्म्यानें आत्म्याचा उद्धार करून घ्यावा; आपल्या आत्म्याला अधोगतीस नेऊं नये; कारण आत्मा हाच आत्म्याचा हितकर्ता व आत्मा हाच आत्म्याचा शत्रु होय. ॥५॥**

**अन्वयः**—आत्मना आत्मानम् उद्धरेत्, आत्मानं न अवसादयेत्; आत्मा एव हि आत्मनः बंधुः, आत्मा एव आत्मनः रिपुः. ॥ ५ ॥

तंव हांसोनि कृष्ण म्हणे । तुझें नवल हें बोलणें । कवणासि काय दिजेल कवणें । अद्वैतीं एथ ॥६७॥ पैं व्यामोहाचिये[१] शेजे । बळियां[२] अविद्या निद्रितु होईजे । ते वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे । जन्म-मृत्यूंचा ॥६८॥ पाठीं अवसांत[३] ये चेवो[४] । तैं तें अवघेंचि होय वावो[५] । ऐसा उपजे नित्य सद्भावो । तोही आपणपांचि ॥६९॥ म्हणऊनि आपणचि आपणया । घातु किजतु असे धनंजया । चित्त देऊनि नाथिलियां[६] । देहाभिमाना ॥७०॥

**बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।**
**अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥६॥**

**अन्वयः**-येन आत्मना एव आत्मा जितः, तस्य आत्मनः बंधुः आत्मा; अनात्मनः तु शत्रुत्वे आत्मा एव शत्रुवत् वर्तेत. ६

हा विचारूनि अहंकार सांडिजे । मग असतीच वस्तु[७] होईजे । तरी आपली स्वस्ति[८] सहजें । आपण केली ॥७१॥ येऱ्हवीं कोशकीटकाचिया[९] परी । तो आपणयां आपण वैरी । जो आत्मबुद्धि शरीरीं । चारुस्थळीं[१०] ॥७२॥ कैसे प्राप्तीचिये वेळे । निदैवा आंधळेपणाचे डोहळे । कीं असते आपुले डोळे । आपण झांकी ॥७३॥ कां कवण एकु भ्रमलेपणें । मी तों नव्हे गा चोरलों म्हणे । ऐसा नाथिला[११] छंदु अंतःकरणें । घेऊनि ठाके ॥७४॥ येरवीं होय तें तोचि आहे । परि काइ कीजे बुद्धि तैसी नोहे । देखा स्वप्नींचेनि घायें । कीं मरे साचें ॥७५॥ जैसी ते शुकाचेनि[१२] आंगभारें । नळिका भोविन्नली[१३] एरी[१४] मोहरें । तेणें उडावें परि न पुरे । मनशंका ॥ ७६ ॥ वायांचि मान पिळी । अटुवें[१५] हियें[१६] आंवळी । टिटांतु[१७] नळी । धरूनि ठाके ॥७७॥ म्हणे बांधला मी फुंडा । ऐसिया भावनेचिया पडे खोडां[१८] । कीं मोकळिया पायांचा चवडा । वांवी[१९] आधिकें ॥७८॥ ऐसा काजेंवीण[२०] आंतुडला[२१] । तो सांग पां काय आणिकें[२२] बांधला । मग न सोडीच जऱ्ही नेला । तोडूनि अर्धा ॥७९॥ म्हणऊनि आपणयां आपणचि रिपु । जेणें वाढविला हा संकल्पु । येर स्वयंबुद्धी म्हणे बापु । जो नाथिलें नेणे ॥८०॥

**जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ७**
**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः ।**
**युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ८**

**अन्वयः**-जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः [ भवति. यदा ], योगी विजितेंद्रियः, ज्ञानविज्ञानतृप्तात्मा, समलोष्टाश्मकांचनः, शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः [समः] कूटस्थ [भवति, तदा] युक्तः इति उच्यते. ॥७॥८॥

तया स्वांतःकरणजितां[२४] । सकळकामोपशांता[२५] । परमात्मा परौतां[२६] । दूर नाहीं ॥८१॥ जैसा किडाळाचा[२७] दोषु जाये । तरी पंधरें[२८] तेंचि होये । तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्पलोपीं ॥८२॥ हा घटाकारु जैसा । निमालियां[२९] तया अवकाशा । नलगे मिळों जाणें आकाशा । आनौं[३०] ठाया ॥८३॥ तैसा देहाहंकारु नाथिला । हा समूळ जयाचा नाशिला । तोचि परमात्मा संचलौं[३१] । आधींचि आहे ॥८४॥ आतां शीतोष्णाचिया वाहणी । तेथ सुखदुःखाची कडसणी[३२] । इयें नसमाती[३३] कांहीं बोलणीं । मानापमानाचीं ॥८५॥ जे जिये वाटा सूर्यु जाये । तेउतें तेजाचें विश्व होये । तैसें तया पावे तें आहे । तोचि म्हणउनी ॥८६॥ देखें मेघौनि सुटती धारा । तिया न रुपती जैसिया सागरा । तैसीं शुभाशुभें योगीश्वरा । नव्हती आनें[३४] ॥८७॥ जो हा विज्ञानात्मकु[३५] भावो । तया विवरितां[३६] जाहला वावो । मग लागला जंव पाहों । तंव ज्ञान तें

१ भ्रांति. २ बळवान. ३ अकस्मात्. ४ जागृति. ५ व्यर्थ. ६ मिथ्या. ७ ब्रह्म. ८ कल्याण ९ आपल्या अंगाभोंवतीं काड्यांचें घर बांधणारा किडा. १० सुशोभित. ११ (तरवारीचे) वारानें. १२ राघू. १३ फिरली. १४ उकट, दुसरीकडे. १५ चवडे. १६ छाती. १७ चोंचींत. १८ खरोखर. १९ खोड्यांत. २० गुंतवी. २१ निरर्थक. २२ सांपडला. २३ दुसऱ्यानें. २४ जिंकणारा. २५ सर्व इच्छा तृप्त झालेला. २६ इतरांप्रमाणें. २७ हिणकटाचा. २८ पंधराच्या दराचें उत्तम सोनें. २९ नाश पावल्यावर ३० अन्य स्थळीं. ३१ सर्वत्र भरलेला. ३२ विचार. ३३ सहन न होणें. ३४ भिन्न. ३५ संसारिक ज्ञान. ३६ विचार करितां.

त्या वेळेस श्रीकृष्ण हसून म्हणतातः--तुझ्या बोलण्याचें मला नवल वाटतें. कारण, ह्या अद्वैतांत कोणाला कोणीं काय द्यावयाचें आहे ? ६७ परंतु भ्रांतिरूप शय्येवर बळकट अज्ञानानें जेव्हां मनुष्य निजलेला असतो, त्या वेळेस जन्ममृत्यूंचीं दुष्ट स्वप्नें त्यास भोगावीं लागतात ! ६८ नंतर अकस्मात् जागा झाल्यावर तीं सर्व स्वप्नें व्यर्थ होतात; आणि आपण खरे आहों असा निश्चय होतो, तोही आपणच होय. ६९ म्हणून, हे धनंजया, खोट्या देहावर भरंवसा ठेवला म्हणजे आपणच आपले घाताला प्रवृत्त होतों. ७०

**ज्यानें आत्म्याच्या साहाय्यानें आत्मा जिंकिला, त्याचा आत्माच त्याचा बंधु—हितकर्ता होय; परंतु ज्यानें आत्मा जिंकला नाहीं, त्याचा आत्माच त्याचा शत्रु होतो. ॥ ६ ॥**

हा विचार करून अहंकार सोडला, म्हणजे मग आपलें ब्रह्मस्वरूपच आपल्या प्रत्ययास येतें. असें झालें म्हणजे आपण आपलें कल्याण केलें असें सहज होतें. ७१ जो सुशोभित अशा शरिराचे ठिकाणीं लुब्ध होऊन आत्मस्वरूप विसरतो, व आपलेपणा मानितो, तो कोशकिड्याप्रमाणें आपला आपण वैरी होतो. ७२ लाभाची वेळ आली असतां हतभागी मनुष्याला अंधळेपणाचे डोहळे आठवून तो आपले डोळे झांकितो, व वस्तुलाभाला अंतरतो; ७३ किंवा एखादा मनुष्य भ्रमानें माझा मीच हरवलों असें म्हणतो, आणि अंतःकरणांत तोच खोटा भाव धरून बसतो. ७४ येरवीं या भ्रमाशिवाय पाहूं गेलें असतां तो स्वतांच ब्रह्म आहे; परंतु कांहीं केल्यानें त्याचे बुद्धीला तसा भास होत नाहीं. पहा कीं–स्वप्नांतील तरवारीचे वारानें कोणी खरोखर मरतो काय ? ७५ राघूला धरण्याकरितां टांगलेली झाडावरील नळी त्याच्या अंगभारानें उलट फिरली असतां, तो उडून न जातां आपणच फिरलों अशी मनांत शंका येऊन ती जशी सोडीत नाही, ७६ व्यर्थ मान हालवतो, आणि छातीनें व चवड्यानें ती नळी आवळून चोंचीनें धरून ओरडतो, ७७ मी खरोखर बांधला गेलों अशा समजुतीनें खोड्यांत पडतो, आणि मोकळ्या पायांचे चवड्यानें नळी बळकट धरितो, ७८ आणि नंतर त्याला अर्धा तोडून नेला तरी तो ती नळी सोडीत नाहीं; असा जो निरर्थक सांपडला, त्याला कोणी दुसरें बांधावयास आलें होतें का सांग बरें ! ७९ म्हणून, ज्यानें मनांतील संकल्प जास्ती वाढविले आहेत, तो आपला आपणच शत्रु होय. पण जो पुरुष वृथाभिमान धारण करीत नाहीं, तो आत्मज्ञानी होय ८०

**ज्यानें आपलें मन जिंकिलें व ज्याच्या मनाला प्रसन्नता प्राप्त झाली आहे, तो जीव परमात्मरूपी आहे. जेव्हां योगी आपलीं इंद्रियें स्वाधीन ठेवितो, ब्रह्मज्ञान व अनुभविक ज्ञान यांनीं तृप्त असतो, माती, दगड व सोनें हीं सारखीं समजतो, शीत-उष्ण, सुख-दुःख तसेच मान-अपमान हीं सारखीं मानितो, आणि निर्विकारस्वरूपीं मन स्थिर ठेवितो, तेव्हां त्याला 'युक्त' असें म्हणतात. ॥७॥८॥**

ज्यानें आपलें मन जिंकिलें आहे, व ज्याच्या सर्व वासना शांत झाल्या आहेत त्याला इतरांप्रमाणें परमात्मा लांब नाहीं. ८१ सोन्याचा हिणकटपणा तावून नाहींसा झाल्यावर तेंच जसें उत्तम सोनें होतें, तद्वत् मनांतील संकल्प नाहींसे होतांच जिवास ब्रह्मत्व येतें. ८२ घटांतील आकाशाला, घटाचा नाश झाल्यावर जसें महाकाशाला मिळण्याकरितां दुसरे ठिकाणीं जावें लागत नाहीं, ८३ तसा ज्याच्या देहांतील खोट्या अहंकाराचा समूळ नाश झाला, तो पुरुष मुळचाच परमात्मा आहे. ८४ अशा स्थितींत शीत किंवा उष्ण, सुख किंवा दुःख, मान किंवा अपमान यांचा विचार त्याचे ठिकाणीं मुळींच संभवत नाहीं; म्हणजे त्याला हें सर्व सारखें दिसतें. ८५ ज्या ज्या वाटेनें सूर्य जातो, त्या त्या ठिकाणीं त्याचा प्रकाश पडतो; त्याप्रमाणें, त्याला जी जी वस्तु आढळते, ती ती–तो स्वतः ब्रह्मरूप बनल्यामुळें–ब्रह्मरूपीच भासते. ८६ पहा कीं, मेघांपासून सुटणाऱ्या पावसाच्या धारा ज्याप्रमाणें समुद्राला खुपत नाहींत, त्याचप्रमाणें, जो ब्रह्मरूप बनला आहे, त्याला शुभाशुभ कर्में हीं भिन्न वाटत नाहीत. ८७ परोक्ष (संसारिक) ज्ञानाचा विचार करूं लागल्यावर, तें व्यर्थ आहे असा ज्याला भास होतो, त्याला, तो ज्ञानाचा शोध करूं

तोचि ॥८८॥ आतां व्यापकु कीं ऐकदेशी[1] । हे ऊहा[2]-पोही जे ऐसी । ते करावी ठेली[3] आपैशी । दुजेनवीण ॥८९॥ ऐसा शरीरिचि परि कौतुकें । परब्रह्माचेनि पैंडें तुके । जेणें जिंतलीं एकें । इंद्रियें गा ॥९०॥ तो जितेंद्रियु सहजें । तोचि योगयुक्तु म्हणिजे । जेणें सानें थोर नेणिजे । कवणे काळीं ॥९१॥ देखें सोनयाचें निखळ । मेरुयेसणें[6] ढिसाँळ । आणि मातियेचें डिखळ । सरिसेंचि मानी ॥९२॥ पाहतां पृथ्वीचें मोल थोडें । ऐसें अनर्घ्य रत्न चोखडें । देखे दगडाचेनि पाडें । निचाडु ऐसा ॥९३॥

**सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु ।**
**साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥९॥**

**अन्वयः**–यः सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु, साधुषु च पापेषु अपि समबुद्धिः [आस्ति, सः] विशिष्यते. ॥९॥

तेथ सुहृद[10] आणि शत्रु । कां उदासु आणि मित्रु । हा भावभेदु विचित्रु । कल्पू कैंचा ॥९४॥ तया बंधु कोण कांह्याचा[11] । द्वेषिया कवण तयाचा । मीचि विश्व ऐसा जयाचा । बोधु जाहला ॥९५॥ मग तयाचिये दिठी । अधमोत्तम असे किरीटी । काय परिसाचिये कसवटी । वानियाँ[12] कीजे ॥९६॥ ते[13] जैसी निर्वाणें[14] सुवर्णचि करी । तैसी जयाचि बुद्धी चराचरीं । होय साम्याचि उंजेरी[15] । निरंतर ॥९७॥ जे ते विश्वाळंकाराचें विसुरें[16] । जरी आहाती आनानें आकारें । तरी घडले एकचि भांगारें[17] । परब्रह्में ॥९८॥ ऐसें जाणणें जें बरवें । तें फावलें[18] तया आघवें । म्हणोनि आहाचवाहाचे[19] न झकवे[20] । येणें आकाराचित्रें[21] ॥९९॥ घापे[22] पटामाजि दृष्टी । दिसे तंतूंची सैंघ सृष्टी । परी तो एकवांचूनि गोष्टी । दुजी नाहीं ॥१००॥ ऐसेनि प्रतीती हें[23] गवसे । ऐसा अनुभव जयातें असे । तोचि समबुद्धि हें अनारिसें[24] । नव्हे जाणें ॥१॥ जयाचें नांव तीर्थरावो[25] । दर्शनें प्रशस्तीसि[26] ठावो । जयाचेनि संगें ब्रह्मभावो । भ्रांतासही ॥२॥ जयाचेनि बोलें धर्मु जिये । दिठी महासिद्धीतें विये । देखें स्वर्गसुखादि इयें । खेळु जयाचा ॥३॥ विपायें जरी आठवला चित्ता । तरी दे आपुली योग्यता । हें असो तयातें प्रशंसिता । लाभु आथि ॥४॥

**योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः ।**
**एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः १०**

**अन्वयः**–योगी रहसि स्थितः एकाकी, यतचित्तात्मा, निराशीः, अपरिग्रहः [ च सन् ] सततं आत्मानं युंजीत. १०

पुढती[27] अस्तवेर्नी[28] ऐसें । जया पाहले[29] अद्वैतदिवसें[30] । मग आपणपांचि आपणु असे । अखंडित ॥ ५ ॥ ऐसिया दृष्टी जो विवेकी । पार्था तो ऐकाकी[31] । सहजें अपारिग्रही[32] जो तिहीं लोकीं । तोचि म्हणउनी ॥६॥ ऐसियें असाधारणें[33] । निष्पन्नांचीं[34] लक्षणें । आपुलेनि बहुवसपणें[35] । श्रीकृष्ण बोले ॥७॥ जो ज्ञानियांचा बापु[36] । देखणेयांचे दिठीचा दीपु । जया दादुलयाचा[37] संकल्पु । विश्व रची ॥ ८ ॥ प्रणवाचिये[38] पेठे । जाहलें शब्दब्रह्म मांजिठें[39] । तें जयाचिये यशा धाकुटें । वेढूं न पुरे ॥९॥ जयाचेनि आंगिकें[40] तेजें । आवो[41] रविशशीचिये वाणिजे[42] । म्हणऊनि जग हें वेसजे[43]- । वीण असे तया ॥११०॥ हां गा नामाचि एक जयाचें । पाहतां गगनही दिसे टांचें[44] । गुण एकैक काय तयाचे । ओळखिशील[45] तूं ॥११॥ म्हणोनि असो हें वानणें । सांगों नेणों कवणाचीं लक्षणें । दावावीं मिषें येणें । कां बोलिलों ते ॥१२॥ ऐकें द्वैताचा ठावोचि फेडी[46] । ते ब्रह्मविद्या किजेल उघडी । तरि अर्जुना पढिये[47] हे गोडी । नासेल हन ॥१३॥ म्हणोनि तें तैसें बोलणें । नव्हे सपातळ[48] आड लावणें ।

१ अध्यापक. २ वाटाघाट. ३ राहिली. ४ कसाला. ५ तोलला जातो. ६ मेरु पर्वताएवढें. ७ मोठें. ८ अमोल. ९ ज्याला गरज नाहीं तो. १० आप्त. ११ कशाचा. १२ अंतर. १३ कसवटी. १४ केवळ, उत्तम. १५ स्पष्ट. १६ ठसे. १७ सुवर्ण. १८ समजलें. १९ वरचेवर. २० फसत नाहीं. २१ चित्रविचित्र विश्वरचना. २२ घातल्यानें. २३ जग. २४ खोटें, वेगळें. २५ प्रयाग. २६ समाधानास. २७ पुनः. २८ मावळत नाहीं. २९ उदय झाला, प्रातःकाल झाला. ३० ज्ञानसूर्य. ३१ अद्वितीय. ३२ संग्रह न करणारा. ३३ ठोकळ. ३४ सिद्धाचीं. ३५ षड्गुणैश्वर्यसंपन्नतेनें. ३६ श्रेष्ठ. ३७ समर्थाचा. ३८ ॐकाराच्या. ३९ उत्तम वस्त्र. ४० अंगींच्या. ४१ प्रतिष्ठा. ४२ व्यापारास. ४३ आधार. ४४ तुच्छ. ४५ जाणशील. ४६ नाहींसा करी. ४७ अति प्रिय. ४८ पडदा.

लागला असतां तें आपणच आहों असें वाटूं लागतें. ८८ नंतर, मी व्यापक आहें किंवा अव्यापक आहें याची तो वाटाघाट करूं लागल्यावर, ती जागच्या जागींच राहते; कारण, त्याच्या मनांत द्वैतभाव नसतो. ८९ अशा रीतीनें शरिरांत राहून ज्यानें आपलीं इंद्रियें जिंकलीं आहेत, व जो कौतुकानें परब्रह्माच्या योग्यतेला आला आहे, ९० तोच सहज जितेंद्रिय आणि तोच योगी! कारण, त्याला लहान आणि थोर हा भेद कधीं नसतो. ९१ असें पहा कीं, शुद्ध सोन्याचा मेरू-एवढा पर्वत व मातीचें ढेंकूळ हीं दोन्ही जो सारखींच मानतो, ९२ ज्याचें मोल पाहूं गेलें असतां त्यापुढें पृथ्वीचेंही मोल थोडें आहे अशा रत्नाला केवळ दगडाप्रमाणें मानण्याइतका जो निरिच्छ असतो, ९३

**ज्या योग्याची सुहृद् (प्रत्युपकाराची आशा न धरितां उपकार करणारा), मित्र (सहवासानें प्रीति करणारा), शत्रु, उदासीन, मध्यस्त, द्वेषास योग्य व संबंधी यांचे ठिकाणीं, आणि साधूचे ठिकाणीं, तशीच पाप्याचे ठिकाणींही समबुद्धि असते, तो सर्वांत श्रेष्ठ आहे. ९**

त्याचे ठिकाणीं आप्त आणि शत्रु अथवा उदासीन आणि मित्र अशा विचित्र कल्पना कोठून येणार? ९४ मीच जग आहें असा ज्याच्या मनांत बोध झाला आहे, त्याला बंधु कोण आणि द्वेषी कशाचा? ९५ मग, अर्जुना, त्याच्या दृष्टीला लहान आणि थोर असा कोठून भास होणार? असें पहा कीं, परिसाच्या कसोटीस लागल्यावर निरनिराळे कस लागतील काय? ९६ त्या कसोटीपासून जसें शुद्धच सोनें उत्पन्न होतें, तशी त्याची बुद्धि नेहमीं चराचरांचे ठिकाणीं केवळ एकत्वच जाणते. ९७ विश्वरूप अलंकारांचे ठसे जरी पुष्कळ आकारांचे आहेत, तरी ते एकाच परब्रह्मरूपी सुवर्णाचे घडलेले आहेत; ९८ असें शुद्ध व खरें तत्त्व ज्याला पूर्णपणें समजलें आहे, तो चित्रविचित्र रचनेनें वरचेवर फसला जात नाहीं. ९९ वस्त्राकडे पाहिलें असतां जसें तें सर्व तंतुमय दिसतें, तसें त्याला ब्रह्मावांचून जगतांत दुसरें कांहीं दिसत नाहीं. १०० अशा रीतीनें सर्व जग भरलेलें आहे असा ज्याला अनुभव येतो, तोच समबुद्धि होय हें खोटें नाहीं असें पक्कें समज. १

ज्याचें नांव तीर्थराज होय, ज्याचें दर्शन घेतलें असतां अंतःकरणाला समाधान होतें, आणि ज्याच्या संगतीनें, अहंकारानें भ्रमित झालेल्या पुरुषांची भ्रांति जाऊन तो ब्रह्मस्वरूप होतो, २ ज्याचें बोलणें हें धर्माचें जीवन, आणि दृष्टि ही महासिद्धि उत्पन्न करणारी होय, व हीं स्वर्गसुख इत्यादि सुखें हे ज्याचे खेळ आहेत, ३ अशा मनुष्याची जरी चित्तांत आठवण झाली, तरी ती आपली योग्यता देतो. फार काय सांगावें? त्याची स्तुति केली असतां महान लाभच आहे. ४

**योग्यानें एकटेंच एकांतांत वास करून, आणि मन व देह स्वाधीन ठेवून, कशाचीही आशा व संग्रह न करितां सतत आत्मध्यान करावें. ॥ १० ॥**

जो कधींही मावळत नाहीं असा ज्ञानसूर्य ज्याचे हृदयांत उदय पावला आहे, तो आपण आपल्या ठिकाणींच सदोदीत ब्रह्मानंदांत असतो. ५ पार्था, अशा दृष्टीनें जो विचार करितो, तोच अद्वितीय व तोच तिन्ही लोकीं संग्रह न करणारा असें जाण. ६ अशा प्रकारें आपल्या स्वतांच्याहीपेक्षां विशेष गौरवानें श्रीकृष्णांनीं साधूंचीं ठोकळ लक्षणें सांगितलीं. ७ जो सर्व ज्ञानी लोकांत श्रेष्ठ, व सर्व पाहणाऱ्यांच्या दृष्टीचा प्रकाशक, आणि ज्या समर्थाच्या केवळ संकल्पानें विश्वाची रचना होते; ८ ॐकाराच्या बाजारांत जें शब्दब्रह्मरूप उत्तम वस्त्र निघालें, तें ज्याच्या यशास आच्छादन करण्यास पुरत नाहीं; (ज्या श्रीकृष्णाचें यशाचें वेदही वर्णन करूं शकत नाहींत;) ९ ज्याच्या अंगाच्या तेजानें सूर्य आणि चंद्र यांच्या व्यापारांस प्रतिष्ठा येते, तेव्हां हें जग त्याच्या आधाराशिवाय आहे काय? ११० पहा कीं, ज्याच्या नुसत्या नांवाबरोबर गगन तुच्छ दिसतें, असे याचे किती गुण तूं जाणशील? ११ म्हणून ही प्रशंसा आतां पुरे; कारण, अशा लक्षणांनीं युक्त जो श्रीकृष्ण भगवान, तो ज्या साधूंचें वर्णन करितो, त्यांचीं लक्षणें आम्ही सांगूं शकत नाहीं; परंतु सांगावीं म्हणून सांगितलीं. १२ जी ब्रह्मविद्या द्वैताचा नाश करते, ती जर स्पष्ट केली, तर आपला प्रियकर असा जो अर्जुन, त्याची प्रीति नाहींशी होईल, १३ म्हणून ब्रह्मज्ञानाविषयीं न बोलतां

केलें मनचि वेगळवाणें । भोगावया ॥१४॥ जया सोहंभाव[1] अटकु[2] । मोक्षसुखालागोनि रंकु । तयाचिये दिठीचा झेंणें कळंकु । लागेल तुझिया प्रेमा ॥१५॥ विपायें[3] अहंभाव ययाचा जाईल । मी तेंचि हा जरी होईल । तरि मग काय कीजेल । एकलेया ॥१६॥ दिठीचि पाहतां निविजे । कां तोंड भरोनि बोलिजे । नातरी दाटूनि[5] खेंवं दीजे । ऐसें कोण आहे ॥१७॥ आपुलिया मना बरवी । असैमाई[6] गोठी जीवीं । ते कवणेंसि चावळावी । जरी ऐक्य जाहलें ॥१८॥ इया काकुळती जनार्दनें । अन्योपदेशाचेनि[9] हांता[10] शेंनें । बोलामाजि मन मनें । आलिंगूं सरलें ॥१९॥ हें परिसतां जरी कोंनडें[11] । तरी जाण पां पार्थ उघडें । कृष्णसुखाचेंचि रूपडें । वोतलें गा ॥१२०॥ हें असो वयसेचिये[12] शेवटीं । जैसें एकचि विये वांझोटी । मग ते मोहाची त्रिपुटी[13] । नाचों लागे ॥२१॥ तैसें जाहलें श्रीअनंता । ऐसें तरि मी न म्हणता । जरी तयाचा न देखता । अतिशयो[14] एथ ॥२२॥ पाहा पां नवल कैसें चोज[15] । कें[16] उपदेशु केउतें[17] झुंज[18] । परि पुढें वोलभाचें[19] भोज[20] । नाचत असे ॥२३॥ आवडी आणि लाजवी । व्यसन आणि शिणवी । पिसें[21] आणि न भुलवी । तरी तें काइ ॥२४॥ म्हणऊनि भावार्थु तो ऐसा । अर्जुन मैत्रियेचा कुंवासा[22] । कीं सुखें शृंगारलिया मानसा । दर्पणु तो ॥२५॥ यापरी बोप[23] पुण्यपवित्र । जगीं भक्तिबीजासि सुक्षेत्र । तो श्रीकृष्णकृपे पात्र । याचिलागीं ॥२६॥ हो कां आत्मनिवेदनातळींची[24] । जे पीठिका[25] होय सख्याची । पार्थु अधिष्ठात्री[26] तेथिंची । मातृका[27] गा ॥२७॥ पासींचि गोसांवी[28] न वानिजे[29] । मग पाइकाचा[30] गुण घेइजे । ऐसा अर्जुन तो सहजें । पढिये हरी ॥२८॥ पाहा पां अनुरागें[31] भजे । जे प्रियोत्तमें[32] मानिजे । ते पतीहूनि काय न वानिजे । पतिव्रता ॥२९॥ तैसा अर्जुनाचि विशेषें स्तवावा । ऐसें आवडलें मज जीवा । जे तो त्रिभुवनींचिया दैवां । एकायतनु[33] जाहला ॥१३०॥ जयाचिया आवडीचेनि पांगें[34] । अमूर्तुही मूर्ति आवगे[35] । पूर्णाहि परी लागे । अवस्था जयाची ॥३१॥ तंव श्रोते म्हणती दैव । कैसी बोलाची हवाव[36] । काय नादांतें[37] हन बरवें[38] । जिणोनि[39] आली ॥३२॥ हांहो नवल नोहे देशी । मऱ्हाटी बोलिजे तरी ऐशी । वांणें[40] उमटताहे आकाशीं[41] । साहित्य[42] रंगाचें ॥३३॥ कैसें उन्मेखचांदिणें[43] तार[44] । आणि भावार्थु पडे गार । हेचि श्लोकार्थ कुमुदिनी फार[45] । सांविया[46] होती ॥३४॥ चाडेंचि[47] निर्चाडा[48] करी । ऐसी मनोरथीं ये थोरी । तेणें विवळले[49] अंतरीं । तेथ डोलु[50] आला ॥३५॥ तें निवृत्तिदासें जाणितलें । मग अवधान द्या म्हणितलें । नवल पांडवकुळीं पाहलें[51] । कृष्णदिवसें ॥३६ देवकीया उदरीं वाहिला । यशोदा सायासें पाळिला । शेखीं[52] उपेगा[53] गेला । पांडवांसी ॥३७॥ म्हणऊनि बहुदिवस वोळगावा[54] । कां अवसरु[55] पाहोनि विनवावा । हाही सोसु[56] तया सदैवा । पडेचिना ॥३८॥ हें असो कथा सांगें वेगीं । मग अर्जुन म्हणे सलगी[57] । देवा इयें संताचिन्हें आंगीं । न ठेंकती[58] माझ्या ॥३९॥ येऱ्हवीं या लक्षणांचिया निजसारा[59] । मी अपाडें[60] कीर अपुरा । परि तुमचेनि बोलें अवधारा[61] । थोरावें[62] जरी ॥१४०॥

---

१ अहंब्रह्म. २ अडथळा. ३ कदाचित्. ४ आनंदानें. ५ आलिंगन. ६ न मावणारी. ७ बोलावी. ८ अडचण. ९ योगशास्त्राचे. १० मिषानें. ११ अवघड. १२ वयाच्या. १३ पुतळी. १४ अतिशय प्रेम. १५ आवड. १६ कोठें. १७ कोणीकडे. १८ युद्ध. १९ प्रीतीचें. २० चित्र. २१ पिशाच. २२ घर. २३ धन्य. २४ आत्मनिवेदनाच्या मागची. २५ भूमिका. २६ मालक. २७ देवता. २८ भगवान. २९ वर्णन करावा. ३० सेवकाचा. ३१ प्रीतीनें. ३२ नवऱ्यानें. ३३ एकच अधिष्ठान. ३४ संबंधानें. ३५ अवतरे. ३६ गंमत, शोभा. ३७ स्वरास. ३८ सौंदर्य. ३९ जिंकून. ४० ठसे. ४१ हृदयीं. ४२ श्रवणसुखाचे नवरस. ४३ ज्ञान. ४४ चकचकित. ४५ प्रसृत. ४६ सहज. ४७ इच्छा. ४८ निष्काम. ४९ प्रकाशले. ५० विस्मय. ५१ उजाडलें. ५२ शेवटीं. ५३ उपयोगीं पडला. ५४ सेवा करावी. ५५ समय. ५६ प्रयास. ५७ लडिवाळपणानें. ५८ वसत नाहींत. ५९ तात्पर्य. ६० अयोग्य. ६१ विचार करा. ६२ योग्य होईन.

त्याच्या आड पडदा लावून अर्जुनाचें मन त्याच्या व आपल्या प्रेमाचा उपभोग घेण्याकरितां वेगळें ठेविलें. ११४ जे अहंब्रह्मापर्यंत येऊन ठेपले आहेत, व जे मोक्षसुखाच्या प्राप्तीकरितां गयावयां झाले आहेत, त्यांच्या दृष्टीचा कलंक कदाचित् तुझ्या ब्रह्मविद्येच्या ठिकाणीं असलेल्या प्रेमाला लागेल. ११५ कदाचित अर्जुनाचा मीपणा जाऊन 'मी तोच हा' असें जर होईल, तर मग मीं एकट्यानें काय करावयाचें आहे? ११६ पाहिल्याबरोबर डोळे शांत होण्यास, व तोंड भरून बोलण्यास, किंवा आनंदानें दृढ आलिंगन देण्याला दुसरें कोण आहे? ११७ जर अर्जुनाचें आणि माझें ऐक्य झालें, तर आपल्या मनांत न मावणारी अशी उत्तम गोष्ट ती कोणाजवळ बोलावी? ११८ या अडचणीमुळें श्रीकृष्णांनीं बोलण्यांत साधूंचीं लक्षणें सांगून ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला व त्याचें मन वळवलें. ११९ हें तुम्हां श्रोत्यांना जरी ऐकतांना अशक्य वाटेल, तरी पार्थ हा खरोखर श्रीकृष्णाच्या सुखाचीच ओतींव मूर्ति आहे असें पक्कें समजा. १२० हें असो; एखाद्या वांझ स्त्रीला, तिचें वय होऊन गेल्यानंतर, एकच मूल झालें म्हणजे ती जशी त्याच्यावरील प्रेमाची प्रत्यक्ष पुतळी होऊन नाचूं लागते, १२१ तशी श्रीकृष्णांची गोष्ट झाली आहे! त्यांचें अर्जुनावरील अतिशय प्रेम जर दृष्टोत्पत्तीस न येतें, तर मी असें बोललों नसतों. १२२ पहा कीं, हें काय नवल व कोण आवड? कीं कसला युद्धप्रसंग, आणि हा काय उपदेश? परंतु अशा ठिकाणीं भगवंताच्या प्रीतीचें चित्र जो अर्जुन, त्याच्यापुढें प्रेमाचें कौतुक [ मूर्तिमान ] नाचत आहे! १२३ लज्जा उत्पन्न करणारी आवड, शीण उत्पन्न करणारें व्यसन, व न भुलविणारें पिशाच अशा गोष्टी दृष्टीस पडतील, तर काय उपयोग? १२४ या गोष्टीचें सार इतकेंच कीं, अर्जुन हा श्रीकृष्णाच्या मैत्रीचें घर होय, किंवा सुखानें शृंगारलेलें आपलें मन पाहण्याचा आरसाच होय. १२५ अशा प्रकारें अर्जुन हा धन्य, पुण्यपवित्र आणि भक्तिरूप बीज पेरण्याचें उत्तम शेत असल्यामुळेंच श्रीकृष्णकृपेस पात्र झाला! १२६ श्रवणापासून आत्मनिवेदनापर्यंत जा नऊ प्रकारची भक्ति आहे, त्यांपैकीं आत्मनिवेदनाच्या अलीकडची जी सख्य नांवाची आठवी भक्ति, त्या ठिकाणचा अर्जुन हा मुख्य देवता आहे. १२७ मालक ( भगवान ) श्रेष्ठ शेजारीं असतां त्यांचें वर्णन न करितां सेवकाच्या गुणांचें वर्णन केलें असतां मालकाला आवडावें अशा योग्यतेचा अर्जुन हा भगवंताचा आवडता आहे. १२८ जी पतिव्रता आपल्या पतीची प्रीतीनें सेवा करिते आणि पतीस मान्य होते, त्या पतिव्रतेची पतीपेक्षां वाखाणणी कां करूं नये? १२९ त्याचप्रमाणें, अर्जुनाचीच विशेष स्तुति करावी असें माझ्या मनास वाटलें. कारण, तो त्रिभुवनाच्या भाग्याला पात्र झाला आहे! १३० ज्याच्या आवडीच्या वेडानें निराकार अशा ब्रह्माला देखील अवतार घेणें भाग पडलें; आणि त्याच्या सर्व इच्छा पूर्ण असूनही अर्जुनाबद्दल त्याला उत्कंठा उत्पन्न झाली! १३१ तेव्हां श्रोते म्हणाले:—दैवाची गति काय विचित्र आहे? आणि तशीच वर्णन करण्याची शैली तरी काय आहे? कीं जिच्या सुंदरपणानें नादब्रह्मालाही जिंकिलें आहे. १३२ शुद्ध मराठी भाषेंत जर अशा रीतीचें वर्णन करितां येतें, कीं ज्याच्यापासून हृदयावर शृंगारादि नवरसांचे निरनिराळे ठसे उमटतात, तर हें अतिशय नवल नव्हे काय? १३३ ज्ञानेश्वराचें हें बोलणें कसें आहे म्हणाल, तर ज्ञानरूप चंद्राच्या चांदण्याप्रमाणें स्वच्छ असून त्याच्या भावार्थापासून मनाला आनंद होतो; म्हणून गीतेच्या श्लोकांचा अर्थ चंद्रविकासी कमलाप्रमाणें सहज उमलला आहे! १३४ त्या बोलण्याची अशी योग्यता आहे कीं, ब्रह्मविद्या ऐकणाराची इच्छा याच्या श्रवणापासून तृप्त होते; अशा या बोलापासून श्रोते अंतर्यामीं प्रसन्न होऊन डोलूं लागले. १३५ अशा श्रोत्यांच्या मनांतील भाव निवृत्तिदास ज्ञानदेव यांनीं जाणून, मग, 'श्रोतेहो, इकडे लक्ष द्या' असें ते म्हणाले. कृष्णरूप दिवसानें पांडवकुलावर प्रकाश केला. ( श्रीकृष्णांनीं पांडवांवर कृपा केली. ) १३६ [ तो कृष्ण कसा आहे म्हणाल, तर ] ज्याला देवकीनें आपल्या उदरांत नऊ महिने वागविलें, यशोदेनें अति कष्टानें ज्याचें लालनपालन केलें, तो शेवटीं पांडवांच्या उपयोगीं पडला! १३७ म्हणून, पुष्कळ दिवस त्याची सेवा करावी, किंवा समय पाहून त्याची विनवणी करावी, इतका देखील प्रयास त्या दैववान अर्जुनाला पडला नाहीं! १३८ श्रोते म्हणतात, "ज्ञानेश्वरा, हा पाल्हाळ राहूं द्या, आतां पुढें कथाभाग लवकर सांगा." तेव्हां ज्ञानेश्वर म्हणतातः—अर्जुन लडिवाळपणानें म्हणतो कीं, "देवा, तुम्हीं हीं जीं संतांचीं चिन्हें सांगितलीं, तीं माझ्या अंगीं वसत नाहींत. १३९ येव्हवीं या लक्षणांचें तात्पर्य जाणण्यास मी खरोखर अयोग्य आणि अपुरा असा आहें; परंतु तुमच्या सांगण्यानें जर मला योग्यता आली तर येईल. १४० जर

जी तुम्ही चित्त देयाल। तरी ब्रह्म मियां होइजेल। काय जहालें अभ्यासिजेल। सांगाल जें ॥ ४१ ॥ हांहो नेणों कवणाची काहाणी। आइकोनि श्लाघिजत असों अंतःकरणीं। ऐसी जाहलेपणाची शिरयाणी। कायसी देवा ॥४२॥ हें आंगें म्यां होइजो कां। येतुलें गोसावी आपुलेपणें कीजो कां। तंव हांसोनि श्रीकृष्ण होकां। करूं म्हणती ॥४३॥ देखा संतोषु एक न जोडे। तंवचि सुखाचें सैंघ सांकडें। मग जोडलिया कवणेकडे। अपुरें असे ॥४४॥ तैसा सर्वेश्वरु बळिया सेवकें। म्हणोनि ब्रह्महो होय तो कौतुकें। परि कैसा भारें आंतला पिकें। दैवाचेनि ॥४५॥ जो जन्मसहस्त्रांचियासाठीं। इंद्रादिकांही महाग भेटी। तो अधीनु केतुला किरीटी। जे बोलुही न साहे ॥४६॥ मग ऐका जें पांडवें। म्हणितलें म्यां ब्रह्म होआवें। तें अशेषही देवें। अवधारिलें ॥४७॥ तेथ ऐसेंचि एक विचारिलें। जे या ब्रह्मत्वाचे डोहळे जाहले। परि उदरा वैराग्य आहे आलें। बुद्धीचिया ॥४८॥ येन्हवीं दिवस तरी या अपुरे। परि वैराग्यवसंताचेनि भरें। जे सोहंभाव मोहुरें। मोडोनि आला ॥४९॥ म्हणोनि प्राप्तिफळीं फळतां। ययासि वेळु न लगेल आतां। होय विरक्तु ऐसा अनंता। भरंवसा जाहला ॥१५०॥ म्हणे जें जें हा अधिष्ठील। तें आरंभींच वया फळेल। म्हणोनि सांगितला न वचेल। अभ्यासु वायां ॥५१॥ ऐसें विवरोनियां श्रीहरी। म्हणितलें तिये अवसरीं। अर्जुना हा अवधारीं। पंथराजु ॥५२॥ तेथ प्रवृत्तितरूच्या बुडीं। दिसती निवृत्तिफळाचिया कोडी। जिये मार्गींचा कापडी। महेशु आझुनी ॥५३॥ पैं योगिवृंदें वहिलीं। आडवीं आकाशीं निघालीं। कीं तेथ अनुभवाच्या पाउलीं। धोरणु पडिला ॥५४॥ तिहीं आत्मबोधाचेनि ढेंगुकारें। धांव घेतली एकसरें। कीं येर सकळ मार्ग निदसुरे। सांडूनियां ॥५५॥ पाठीं महर्षी येणें आले। साधकांचे सिद्ध जाहाले। आत्मविद थोरावले। येणेंचि पंथें ॥५६॥ हा मार्गु जैं देखिजे। तैं ताहान भूक विसरिजे। रात्रिदिवसु नेणिजे। वाटे इये ॥५७॥ चालतां पाउल जेथ पडे। तेथ अपवर्गाची खाणी उघडे। आव्हांटलिया तरी जोडे। स्वर्गसुख ॥५८॥ निगिजे पूर्वीलियां मोहरां। कीं येइजे पश्चिमेचियां घरा। निश्चळपणें धनुर्धरा। चालणें एथिंचें ॥५९॥ येणें मार्गें जया ठाया जाइजे। तो गांवो आपणचि होइजे। हें सांगों काय सहजें। जाणसी तूं ॥१६०॥ तेथ पार्थें म्हणितलें देवा। तरि तेंचि मग केव्हां। कां आर्तिसमुद्रौनि न काढावा। बुडतु जी मी ॥६१॥ तंव कृष्ण म्हणती ऐसें। हें उसेंखळ बोलणें कायसें। आम्ही सांगतसों आपैसे। वरि पुशिलें तुवां ॥६२॥

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ११ ॥**

**अन्वयः**–शुचौ देशे स्थिरं, न अत्युच्छ्रितं, न अतिनीचं, चैलाजिनकुशोत्तरं आत्मनः आसनं प्रतिष्ठाप्य. ॥ ११ ॥

तरी विशेषें आतां बोलिजेल। परि तें अनुभवें उपेगा जाईल। म्हणोनि तैसें एक लागेल। स्थान पाहावें ॥६३॥ जेथ आराणुकेचेनि कोडें। बैसलिया उठों नावडे। वैराग्यासी दुणीव चढे। देखिलिया जें ॥६४॥ जो संतीं वसविला ठावो। संतोषासि साहावो। मना होय उत्साहो। धैर्याचा ॥६५॥ अभ्यासुचि आपणयातें करी। हृदयातें अनुभव वरी। ऐसी रम्यपणाची थोरी। अखंड जेथ ॥६६॥ जया आंड जातां पार्था। तपश्चर्या मनोरथा। पाखांडियाहि आस्था। समूळ होय ॥६७॥ स्वभावें वाटे येतां।

१ स्तुति करणें. २ मोठेपणा. ३ चोहोंकडे. ४ संकट. ५ बळकट. ६ भरानें. ७ दडपलेला. ८ मोहोरानें. ९ मोक्षप्राप्ति. १० ग्रहण करील. ११ व्यर्थ होणें. १२ राजमार्ग. १३ आचरण्यास तयार झाल्यावर; संसारवृक्षाच्या. १४ यात्रेकरू. १५ शंकर. १६ प्रथम. १७ आडव्यातिडव्या मार्गानें. १८ हृदयाकाशीं. १९ थांग. २० सरळ मार्गानें. २१ अज्ञानांतील. २२ मागून; मार्गानें. २३ तत्त्वज्ञानी. २४ श्रेष्ठ झाले. २५ मोक्षाची. २६ आडमार्गानें गेल्यास. २७ निघावें. २८ प्रवृत्तीच्या. २९ वाटेस. ३० निवृत्तीच्या. ३१ उत्कंठा. ३२ अमर्याद उतावळा. ३३ अभ्यासानें. ३४ करमणुकीचे. ३५ हौसेनें, सुखानें. ३६ सहाय. ३७ बाजूनें.

तुम्हीं मनांत आणलें, तर मी ब्रह्म सुद्धां होईन ! तुम्ही ज्याचा मला अभ्यास करावयास सांगाल, तो करण्याला मला काय अशक्य आहे? ४१ ही तुम्हीं कोणाची गोष्ट सांगितली हें मला कांहीं कळत नाहीं; परंतु ती ऐकल्यापासून तिची स्तुति करावी असें अंतःकरणांत वाटतें; तर ही योग्यता ज्याच्या अंगांत असेल, त्याच्या आनंदास पारावारच नाहीं ! ४२ प्रभो, याचप्रमाणें माझे अंगीं योग्यता येईल एवढें आपण कराल काय?" तेव्हां श्रीकृष्ण हसून म्हणाले कीं, "हो, तुला आम्ही ब्रह्मरूपी करूं." ४३ असें पहा कीं, जर एक संतोष प्राप्त न झाला तर चोहींकडे सुखाची उणीव असते परंतु तो प्राप्त झाल्यावर मग कोठें सुखाची उणीव येईल? ४४ त्याचप्रमाणें, जो सर्वेश्वराचा पूर्ण सेवक बनला आहे, तो सहज ब्रह्मरूपी होऊं शकेल; पण अर्जुन सुदैवाच्या पिकाच्या भारानें किती लवला आहे पहा: ४५ जो ईश्वर हजारों जन्मांनीं इंद्राला सुद्धां भेटण्यास दुर्मिळ आहे, तो अर्जुनाच्या इतका अधीन झाला आहे कीं, त्याचें बोलणें खालीं पडूं देत नाहीं. ४६ तेव्हां ऐका कीं, अर्जुनानें मी ब्रह्म व्हावें असें जें म्हटलें, तें देवांनीं सर्व ऐकिलें. ४७ त्या वेळेस देवांच्या मनांत असा विचार उत्पन्न झाला कीं, अर्जुनाला ब्रह्म होण्याविषयींच डोहाळे लागले आहेत याचें कारण–ह्याच्या बुद्धीच्या उदरांत वैराग्याचा गर्भ राहिला आहे. ४८ अथवा, अर्जुन हा नूतन झाड असूनही वैराग्यरूप वसंताच्या भरानें अहंब्रह्मरूप मोहरानें वांकला आहे; ४९ म्हणून याला मोक्षरूप फळाची प्राप्ति अगदीं लवकर होईल; कारण हा विरक्त झाला आहे; अशी श्रीकृष्णांचीही खातरी झाली. १५० श्रीकृष्ण म्हणतात:–आतां हा अर्जुन ज्याचें ज्याचें आचरण करील, त्याचें त्याचें त्याला लागलीच फळ मिळेल; म्हणून, ज्याचा अभ्यास याला आपण करावयास सांगूं, तो व्यर्थ जाणार नाहीं. ५१ अशा प्रकारें त्या वेळीं श्रीहरींनीं मनांत विचार करून म्हटलें:—अर्जुना, आम्ही जो तुला योगमार्ग सांगणार आहों, तो सर्व मार्गांचा राजा आहे; तो तूं ऐक. ५२ तो योग असा आहे कीं, ज्याच्या प्रवृत्तिरूपी वृक्षाखालीं कोट्यवधि मोक्षफलें दृष्टीस पडतात; (ज्याचें आचरण करूं लागलें असतां मोक्षप्राप्ति होते;) त्या या मार्गाची श्रीशंकर हे अद्यापपावेतों यात्रा करीत आहेत ! ५३ परंतु योगिजन प्रथम हृदयाकाशांत आडव्यातिडव्या मार्गानें चालूं लागले, नंतर अनुभवाच्या पावलांनीं त्यांना ब्रह्माचा थांग लागला; ५४ तेव्हां इतर अज्ञानरूप सर्व मार्ग सोडून त्या योग्यांनीं आत्मबोधाच्या सरळ मार्गानें एकसारखी धाव घेतली! ५५ त्यांच्या मार्गानें महर्षि आले, आणि ते साधकांचे सिद्ध बनले; त्याचप्रमाणें, तत्त्वज्ञानी हे याच पंथानें श्रेष्ठत्वास पावले. ५६ या मार्गानें जाण्याचा विचार करीत असतां तहान व भूक हीं हारपतात, व याची वाट चालत असतांना रात्र व दिवस यांची आठवण होत नाहीं. ५७ या मार्गाचें क्रमण करीत असतां, ज्या ठिकाणीं मनुष्य पाऊल टाकील त्या ठिकाणीं मोक्षाचीं खाणच उत्पन्न होते; व कदाचित् तो आडमार्गानें गेला तरी स्वर्गसुख मिळतें. ५८ तो पूर्वेच्या वाटेनें निघून म्हणजे प्रवृत्तीची वाट सोडून (इंद्रियांचें आकलन करून) पश्चिमेस येतो. (निवृत्तीच्या वाटेला लागतो.) हे धनुर्धरा, या ठिकाणचें चालणें कोणतें म्हणशील तर निश्चळपणें बसणें हें होय. ५९ या मार्गानें ज्या ठिकाणाला जातो, त्या ठिकाणीं तो गांव आपणच बनतो, हें काय सांगावें ? हें तुला आपोआपच कळेल. १६० तेव्हां पार्थ म्हणाला, "देवा, तर तुम्ही हें योगशास्त्र मला केव्हां सांगाल ? कारण, उत्कंठारूप समुद्रांत बुडालेला जो मी, त्या मला वर कां न काढावा ?" ६१ तेव्हां कृष्ण म्हणाले:–आम्ही होऊन तुला सांगतों आहों, तशांत तू हा प्रश्न केला आहेस; मग इतका उतावीळपणा कां करतोस ? ६२

**योग्यानें शुद्ध प्रदेशीं आपलें आसन घालावें. प्रथम दर्भ, त्यावर मृगाजिन, आणि त्यावर वस्त्र असें घालावें, आणि तें फार उंच किंवा फार सखलही असूं नये. ॥ ११ ॥**

तर आतां आम्ही तुला स्पष्टपणें सांगतों; पण त्याचा अभ्यास केल्यावर उपयोग घडेल. म्हणून तशा रीतीच्या योगाभ्यासाकरितां एक जागा शोधून काढावी. ६३ ती जागा अशी असावी कीं, ज्या ठिकाणीं करमणुकीची हौस पुरी होत असल्यामुळें, बसल्यावर उठूं नये असें वाटावें; आणि जी पाहतांक्षणींच वैराग्य दुप्पट वाढावें. ६४ ती जागा पूर्वी सत्पुरुषांनीं वसविलेली असावी, व तिच्यापासून मनाच्या संतोषाला साहाय्य व्हावें, व धैर्याचा उत्कर्ष व्हावा. ६५ त्या जागेंत अभ्यास करण्यास उत्तेजन यावें आणि मनाला अनुभवानें माळ घालावी, अशी त्या जागेची रम्यपणाबद्दल नेहमीं योग्यता असावी. ६६ पार्था, त्या जागेच्या जवळून गेलें असतां पाखांड्याचेही मनांत तपश्चर्या करण्याबद्दल आस्था उत्पन्न व्हावी. ६७

जरी [1]वेरपडा जाइला अवचितां । तरि सकामुही परि माघौता । निघों विसरे ॥६८॥ ऐसेनि न राहतयातें राहवी । भ्रमतयातें बैसवी । थापटूनि [3]चेवेवी । विरक्तीतें ॥६९॥ हें राज्य वर सांडिजे । मग निवांता एथेंचि असिजे । ऐसें शृंगारियांहि उपजे । देखत-[4]खेंवो ॥१७०॥ जें [5]येणेंमानें बैरवंट । आणि तैसेंचि अति [6]चोखट । जेथ [7]अधिष्ठान प्रगट । डोळां दिसे ॥७१॥ आणिकही एक पाहावें । जें साधकीं [8]वसतें होआवें । आणि जनाचेनि [9]पायरवें । [10]रुळेचिना ॥७२॥ जेथ अमृताचेनि पाडें । मुळाहीसकट गोडें । जो-[11]डेंती दाटें झाडें । सदा फळती ॥ ७३ ॥ पाउला पाउला उदकें । वर्षाकाळावीण अति चोखें । [12]नि-झरें का विशेखें । सुलभें जेथ ॥ ७४ ॥ हा [13]आतपुही [14]अलुमाळु । जाणिजे तरी शीतळु । पवनु अति निश्चळु । मंद झुळके ॥७५॥ बहुतकरूनि निः-शब्द । दाट न रिघे [15]श्वापद । शुक [16]हन [17]षट्पद । तेउतें[18] नाहीं ॥७६॥ [19]पाणिलगें हंसें । दोनी चारी [20]सारसें । कवणें एके वेळे बैसे । तरी कोकिळही होकां ॥७७॥ निरंतर नाहीं । तरि आलीं गेलीं कांहीं । [21]होतु कां मयूरेंही । आम्ही ना न म्हणों ॥७८॥ परि आवश्यक पांडवा । ऐसा ठाव जोडावा । तेथ [22]निगूढ मठ होआवा । का शिवालय ॥७९॥ दोहीं-माजि आवडे तें । जें मानलें होय चित्तें । बहुतकरूनि एकांतें । बैसिजे गा ॥ १८० ॥ म्हणोनि तैसें तें जाणावें । मनराहतें पाहावें । राहेल तेथ रचावें । आसन ऐसें ॥८१॥ वरी चोखट [23]मृगसेवडी । माजी धूतवस्त्राची घडी । तळवटीं [24]अमोडी । [25]कुशांकुर॥८२॥ सकोमळ सरिसे । सुबद्ध राहती आपैसे । एकपाडें तैसें । [26]वोजा घालीं ॥८३॥ परि [27]सांवियाचि उंच होईल । तरि आंग हन डोलेल । [28]नीचें तरी पावेल । [29]भूमिदोषु ॥८४॥ म्हणोनि तैसें न करावें । समभावें धरावें । हें बहु असो होआवें । आसन ऐसें ॥८५॥

**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ।**
**उपविश्यासने युंजाद्योगमात्मविशुद्धये ॥१२॥**

**अन्वयः**–तत्र आसने उपविश्य, मनः एकाग्रं कृत्वा, यतचित्तेन्द्रियक्रियः [सन्] आत्मविशुद्धये योगं युञ्जात्. १२

मग तेथ आपण । एकाग्र अंतःकरण । करूनि सद्गुरुस्मरण । अनुभविजे ॥८६॥ जेथ [30]स्मरतेनि आदरें । सबाह्य सात्त्विकें भरे । जंव काठिण्य विरे । अहंभावाचें ॥८७॥ विषयांचा विसरु पडे । इंद्रियांची [31]कसमस मोडे । मनाची घडी घडे । हृदयामाजीं ॥८८॥ ऐसें ऐक्य हें सहजें । [32]फावे तंव राहिजे । मग तेणेंचि बोधें बैसिजे । आसनावरी ॥८९॥ आतां आंगातें आंग वरी । [33]पवनातें पवनु धरी । ऐसी अ-नुभवाची [34]उजरी । होंचि लागे ॥१९०॥ प्रवृत्ति [35]माघौति मोहरे । समाधि [36]ऐलाडी उतरे । आघवें अ-भ्यासु सरे । [37]बैसतखेंवो ॥९१॥ मुद्रेची प्रौढी ऐशी । तेचि सांगिजेल आतां परियेसीं । तरी [38]ऊरु या [39]जैंव-नासी । जडोनि घालीं ॥९२॥ चरणतळें [40]देव्हडीं । [41]आधारमुद्रमाच्या बुडीं । [42]सुघटितें [43]गाढीं । [44]संचरीं पां ॥९३॥ [45]सव्य तो तळीं ठेविजे । तेणें [46]सिवणीमध्यें पीडिजे[47] । वरी बैसे तो सहजें । [48]वाम चरणु ॥९४॥ [49]गुद [50]मेढ्रांआंतौतीं । चारी अंगुळें [51]निगुतीं । तेथ [52]सौधें सौधें प्रांतीं । सांडूनियां ॥९५॥ माजि अंगुळ एक निगे[53] । तेथ टांचेचेनि [54]उत्तरभागें । [55]नेहेटिजे वरि आंगें । पेललेनी ॥९६॥ उचलिलें कां नेणिजे । तैसें

१ प्राप्ति. २ फिरणाराला. ३ उठवी, जागें करी. ४ बरोबर. ५ चांगलें. ६ शुद्ध. ७ ब्रह्मस्वरूप. ८ वस्ती केलेली. ९ वर्दळ. १० मळेना. ११ आढळतात. १२ झरे. १३ ऊन. १४ थोडें. १५ जनावर. १६ अथवा. १७ भ्रमर. १८ जुजबी. १९ बदकें. २० चक्रवाक पक्षी. २१ असोत. २२ गुप्तस्थान. २३ कृष्णाजिन. २४ साग्र. २५ दर्भ. २६ व्यवस्थित रीतीनें. २७ कदाचित्. २८ सखल. २९ वारठा, वाळवी इत्यादिक. ३० स्मरण केल्यानें. ३१ कासाविशी. ३२ प्राप्त होणें. ३३ प्राणायाम वायूला. ३४ उत्कर्ष. ३५ माघारी. ३६ अलीकडे. ३७ बसल्याबरोबर. ३८ मांडी. ३९ पोटरी. ४० एका पायावर दुसरा वाकडा ठेवणें. ४१ गुदस्थानाच्या. ४२ सुस्थिर. ४३ बळकट. ४४ शिरकावणें. ४५ उजवी टांच. ४६ वृषणावरून गुदस्थानापर्यंत असणारी शिवणरेषा. ४७ दाबावी. ४८ डावा. ४९ अपानद्वार. ५० शिश्नामधील. ५१ नुसतीं. ५२ दीड दीड बोट. ५३ राहते. ५४ वरचे भागानें. ५५ दाबावें.

एखादा मनुष्य सहज वाट चालत असतां जर अवचित त्या ठिकाणीं येईल, तर, जरी तो कामेच्छु असून आपल्या घरीं जात असला, तरी तें ठिकाण सोडून जाऊं नये असें त्याला वाटावें. ६८ अशा रीतीनें, ज्याला त्या ठिकाणीं राहण्याची इच्छा नाहीं त्यालाही ती जागा राहवून घेते, आणि फिरणारास बसवून घेते, व वैराग्य उत्पन्न करिते. ६९. एखादा मनुष्य जरी विलासी असला, तरी त्यालाही ती जागा पाहतांक्षणींच असें वाटावें कीं, आपलें उत्तम राज्य सोडून या ठिकाणीं एकांतवासांत राहावें. १७० अशा प्रकारानें जें स्थान उत्तम, आणि त्याचप्रमाणें अति शुद्ध, त्या ठिकाणीं ब्रह्मस्वरूप डोळ्याला प्रत्यक्ष दृष्टीस पडतें. ७१ आणखी एक गोष्ट साधकानें पहावी: ती ही कीं, त्या ठिकाणीं वस्ती केली असतां मनुष्यांची वर्दळ लागणार नाहीं. ७२ त्या ठिकाणीं अमृतासारखीं मुळांसुद्धां गोड व नेहमीं फळांनीं युक्त अशीं दाट झाडें असावीं. ७३ तेथें पावलापावलावर पाण्याचे झरे असावे; ते असे कीं, ज्यांचें पाणी पावसाळ्यांतही निर्मळ असतें; व तें पुष्कळ असून, उतरण्यास किंवा पाणी काढण्यास सोपे असावे. ७४ त्या ठिकाणीं सूर्याचें ऊन सौम्य असावें, आणि कदाचित् ऊन स्वच्छ पडलें तर त्यापासून ताप उत्पन्न होऊं नये. तसाच वारा मंद व शीतळ वाहत असावा. ७५ तेथें बहुतकरून गडबड नसावी, व श्वापदांची गर्दी नसावी; परंतु राघू आणि भ्रमर हे जुजबी असावेत. ७६ त्या ठिकाणीं बदकें, हंस, दोन चार चक्रवाक पक्षी, तसेंच एखादे वेळेस कोकिळ पक्षी येऊन बसला तरी चालेल. ७७ नेहमीं नव्हत, पण येऊन जाऊन मोर असले, तरी आम्ही त्यांना नको म्हणणार नाहीं. ७८ परंतु, हे पांडवा, अवश्यमेव अशा तऱ्हेची एक जागा पहावी, आणि त्या ठिकाणीं गुप्त गुहा किंवा शिवालय असावें; ७९ आणि दोहोंतून जें आपणास आवडेल किंवा आपल्या चित्तास पसंत पडेल, त्या ठिकाणीं बहुतकरून एकांतवासांत बसावें; १८० म्हणून अशी सर्व सोय पाहून त्या ठिकाणीं मन स्थिर होतें किंवा नाहीं हें पहावें, आणि स्थिर झाल्यास तेथें आसन घालावें; त्याचा प्रकार असा: ८१ वर धूतवस्त्राची घडी असून त्याच्या खालीं कृष्णाजिन व त्याच्या खालीं साग्र दर्भांचें आसन. ८२ ते दर्भ कोमल, सारखे आणि आपोआप एके ठिकाणीं राहतील अशा चांगल्या व्यवस्थेनें जोडलेले असावे. ८३ परंतु तें आसन कदाचित् उंच झालें तर अंग डोलेल, आणि अगदीं सखल झालें तर भूमीचा गारवा वगैरे दोष, बाळवी इत्यादिकांपासून इजा होईल, ८४ म्हणून तसें न करितां तें समभाग घालावें. अशा रीतीनें आसनाची योजना करावी. ८५

**त्या आसनावर बसून, एकाग्र मन करून आणि चित्त व इंद्रियें यांना जिंकून आपल्या अंतःकरणाची शुद्धि करण्याकरितां योगाभ्यास करावा. ॥ १२ ॥**

मग त्या ठिकाणीं मनाची एकाग्रता करून सद्गुरूचें स्मरण करून आत्मसुखाचा अनुभव घ्यावा. ८६ त्या ठिकाणीं, अहंभाव नाहींसा होऊन अष्टसात्विकभाव अंतर्बाह्य उत्पन्न होत तोंपर्यंत सद्गुरूचें आदरानें स्मरण करावें. ८७ जेथें विषयांची आठवण देखील राहणार नाहीं, इंद्रियांची विषयांवरील इच्छा नाहींशी होईल, आणि मनाची हांव मोडून हृदयांत घडी बसेल, ८८ अशा रीतीनें सहज ऐक्य होईपर्यंत त्या ठिकाणीं रहावें; आणि मग असा मनाला बोध झाल्यावर आसनावर बसावें. ८९ नंतर अंगानें अंग सावरावें व प्राणापानवायूनें प्राणापानाला आवरावें; अशा रीतीनें अनुभव वाटूं लागतो. १९० त्या ठिकाणीं प्रवृत्ति मागें फिरून समाधि सहज साध्य होतो. मग आसनावर बसल्याबरोबर सर्व अभ्यास आपोआप पूर्ण होतात. ९१ मुद्रेची जी थोरवी आहे, तिचें आतां वर्णन करितों, तें ऐक. पोटऱ्या मांड्यांस लावून आसन घालावें. ९२ एका पायावर दुसरा पाय वांकडा ठेऊन गुदस्थानाच्या बुडाशीं टांच स्थिर आणि बळकट लावावी. ९३ उजवा पाय खालीं ठेवून, त्यानें, वृषणापासून गुदस्थानापर्यंत असणारी शिवणरेषा मध्यें दाबावी. नंतर डावा पाय उजव्या पायावर सहज ठेवावा. ९४ अपानद्वार आणि शिश्न यांमध्यें जी चार बोटें जागा आहे, तीपैकीं मागेंपुढें दीडदीड बोट सोडून ९५ मध्यें जी एक बोट जागा राहते, ती, शरीर तोलून धरून टांचेच्या वरच्या भागानें दाबावी. ९६ शरीर उचललेलें आहे असें समजूं न देतां पाठीच्या कण्याचा शेवटला भाग उचलावा

पृष्ठांत[1] उचलिजे । गुल्फद्वय[2] धरिजे । तेणेंचि मानें ॥९७॥ मग शरीर संचु[3] पार्था । अशेषही सर्वथा । पार्ष्णींचा[4] माथा । स्वयंभु[5] होय ॥९८॥ अर्जुना हें जाण । मूळबंधाचें[6] लक्षण । वज्रासन गौण । नाम यासी ॥९९॥ ऐसी आधारीं मुद्रा पडे । आणि आधींचौ[7] मार्गु मोडे । तेथ अपानु आंतुलेकडे । घोहोटों लागे ॥२००॥

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।**
**संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् १३**

**अन्वयः**– स्थिरः [ भूत्वा ] कायशिरोग्रीवं अचलं समं धारयन् स्वं नासिकाग्रं संप्रेक्ष्य च दिशः अनवलोकयन् [ योगं कुर्यात्. ] ॥ १३ ॥

तंव करसंपुट[9]आपैसें । वाम चरणीं बैसे । तंव बाहुमूळीं दिसे । थोरींव[10] आली ॥१॥ माजि उभारलेनि दंडें । शिरकमळ होय गोंडें[11] । नेत्रद्वारींचीं कंवाडें[12] । लागूं पाहती ॥२॥ वरिचिलें पातीं न ढळती । तळींचीं तळीं पुंजाळती[13] । तेथ अर्धोन्मीलित[14] स्थिती । उपजे तया ॥३॥ दिठी राहोनि आंतुलेकडे । बाहेर पाउल घाली कोडें । ते ठायीं ठावो पडे । नासाग्रपीठीं[15] ॥४॥ ऐसें आंतुच्या आंतुचि रचे । बाहेरी मागुतें न[16] वचे । म्हणोनि राहणें आंधिये[17] दिठीचें । तेथेंचि[18] होय ॥५॥ आतां दिशांची भेटी घ्यावी । कां रूपाची वास पहावी । हे चाड सरे आघवी । आपैसया ॥६॥ मग कंठनाळ आटे । हनुवटी हिंडती[19] दाटे । ते गाढी होऊनि नेहटे[20] । वक्षस्थळीं ॥७॥ माजि घंटिका[21] लोपे । वरी बंधु[22] जो आरोपे । तो जाळंधरु[23] म्हणिपे । पंडुकुमरा ॥८॥ नाभी वरी पोखे[24] । उदर हें थोके[25] । अंतरीं फांके । हृदयकोशु[26] ॥९॥ स्वाधिष्ठानावरिचिले[27] कांठीं । नाभिस्थानतळवटीं । बंधु पडे किरीटी । वोढियाणा[28] तो ॥२१०॥ ऐसी शरीराबाहेरलीकडे । अभ्यासाची पांखर[29] पडे ॥

**प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।**
**मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः १४**

**अन्वयः**–प्रशांतात्मा, विगतभीः, ब्रह्मचारि व्रते स्थितः, मनः संयम्य, मच्चितः, मत्परः [च] युक्तः आसीत. ॥१४॥

तंव आंतु ग्रंथि[30] मोडे । मनोधर्मांची ॥११॥ कल्पना निमे[31] । प्रवृत्ती शमे[32] । आंग[33] मन विरमे[34] । सांवियाचि[35] १२ क्षुधा काय जाहाली । निद्रा केउती गेली । हे आठवणही हारपली । न दिसे वेगां[36] ॥१३॥ जो मूळबंधें कोंडला । अपानु माघौता मुरडला । तो सवेंचि वरी सांकडला[37] । धरी फुगूं ॥ १४ ॥ क्षोभलेपणें[38] माजे । उवाइलों[39] ठायीं गाजे । मणिपूरेंसीं[40] झुंजे । राहोनियां ॥ १५ ॥ मग थांवल्लिया[41] वाहटुळी । सैंघ[42] घेऊनि घेर[43] डहुळी । बाळपणींची कुहीटुळी[44] । बाहेर घाली ॥ १६ ॥ भीतरीं वेळी[45] न धरे । कोठ्यामाजीं संचरे । कफपित्ताचे थारे[46] । उरों नेदी ॥१७॥ धातूंचे समुद्र उलंडी[47] । मेदाचे पर्वत फोडी । आंतील मज्जा काढी । अस्थिगत[48] ॥१८॥ नाडीतें सोडवी । गात्रांतें[49] विघडवी । साधकातें भेडसावी । परि बिहावें ना ॥१९॥ व्याधीतें दावी । सवेंचि हरावी । आंप[50] पृथ्वी[51] कालवी । एकवाट ॥ २२० ॥ तंव येरीकडे धनुर्धरा । आसनाचा उबारा । शक्ति करी उंजेगारा[52] । कुंडलिनीतें ॥ २१ ॥ नागिणीचें पिलें । कुंकुमें नाहलें । वेळण[53] घेऊनि आलें । सेजे जैसें ॥ २२ ॥ तैसी ते कुंडलिनी । मोटकी[54] औट वळणी । अधो-

१ पाठीच्या कण्याचा शेवटचा भाग. २घोटे. ३ समग्र. ४ खोटेचा. ५ स्वतःसिद्ध. ६ अपानवायु ऊर्ध्वगतीस नेणें. ७ खालचा. ८ संकुचित होणें. ९ द्रोणाच्या आकाराप्रमाणें जोडलेले हात. १० उंचपणा. ११ गढल्यासारखें. १२ पापण्या. १३ पसरतात. १४ अर्धी मिटलेली व अर्धी उघडलेली. १५ नाकाच्या शेंड्यावर. १६ जात नाहीं. १७ अर्धी. १८ शेंड्यावर. १९ टाळ्याखालच्या खळगीस लागते. २० दाबते. २१ कंठमणि. २२ मुद्रा. २३ कंठस्थानांतील बंध. २४ फुगते. २५ सपाट होते. २६ कमल. २७ गुदद्वार. २८ सुषुम्नामार्गानें बेंबीचे वरचे भागानें उजवीकडे वर वायु जातो तो बंध. २९ पसरलेली दशा. ३० वळ. ३१ खुंटे. ३२ कमी होते. ३३ आपोआप. ३४ बंद होतें. ३५ सहज. ३६ लवकर. ३७ संकुचित झाला. ३८ तीव्रतेनें. ३९ प्रशस्त स्थलीं. ४० लिंगचक्र. ४१ जागी केलेली. ४२ सर्व. ४३ पोट. ४४ कुजकी घाण. ४५ मुरड. ४६ ठिकाण. ४७ पालथे करी. ४८ हाडांतील. ४९ अवयव. ५० कफ वगैरे ओला भाग. ५१ शरीर. ५२ जागें. ५३ वेटाळें. ५४ लहान.

आणि त्याचप्रमाणें दोन्ही घोटे सरळ धरावे. ९७ मग, पार्था, हें सर्व शरीर घोटयाच्या माथ्यावर आधाराशिवाय स्वतःसिद्ध राहतें. ९८ अर्जुना, हें मूळबंध नामक आसनाचें लक्षण होय. यलाच वज्रासन असें एक गौण नांव आहे. ९९ अशा रीतीनें मूळबंधाचें आसन केलें, म्हणजे खालचा रस्ता बंद होतो; आणि मग अपानवायु आंतल्या आंत वर जाऊं लागतो. २००

**साधकानें स्वतः स्थिर होऊन शरीर, डोकें व मान हीं नीट स्थिर धरावीं, व आपल्या नाकाच्या शेंड्याकडे दृष्टि ठेवून इकडे तिकडे न पाहतां योगाभ्यास करावा. ॥ १३ ॥**

नंतर डाव्या पायावर सहज दोन्ही हात द्रोणाकार करून ठेवावे, म्हणजे अर्थात् बाहुटे उंच होतात. १ नंतर, शरीर स्थिर राहिल्यानें शिरकमल हें आंत गढतें, आणि त्यामुळें डोळ्यांच्या पापण्या मिटूं लागतात. २ वरची पापणी खालीं येते व खालची पापणी खालींच स्थिर राहते. असें झालें म्हणजे डोळ्यांची अर्धी उघडलेली व अर्धी मिटलेली अशी दृष्टि होते. ३ अशा रीतीनें दृष्टि आंतल्या आंत राहून कौतुकानें फार बाहेर आलीच तर नाकाच्या शेंड्यापर्यंत येते. ४ अशी आंतल्या आंत दृष्टि कायम होऊन पुनः बाहेर येत नाहीं, म्हणून दृष्टीचें नाकाच्या शेंडयावर राहणें कायम होतें. ५ यामुळें, इतर दिशांकडे पाहावें किंवा स्वरूप दृष्टीस पडेल म्हणून वाट पहावी, ही इच्छा आपोआप नाहींशी होते. ६ मग गळ्याची नळी आंत झांकली जाते, आणि हनुवटी गळ्याखालच्या खळगीला लागते व उरावर दृढ होऊन दाबून राहते. ७ हे पांडुकुमरा, नंतर कंठमणि दिसेनासा होतो. अशा रीतीनें जी मुद्रा बनते, तिला जालंधरबंध असें म्हणतात. ८ बेंबी वर फुगते, पोट सपाट होतें, व हृदयकोश अंतर्यामीं पसरतो. ९ अर्जुना, गुदद्वारावरच्या भागावर आणि बेंबीच्या खालच्या भागामध्यें जी मुद्रा बनते, तिला वोडियाणाबंध असें म्हणतात. २१० अशा रीतीनें शरिराच्या बाहेरील भागानें अभ्यासक्रम सुरू झाला,

**योग्यानें प्रसन्न अंतःकरणानें निर्भय होऊन ब्रह्मचर्यव्रत आचरावें, व मनाचें संयमन करून, व माझें चिंतन करीत मत्परायण होऊन रहावें. ॥ १४ ॥**

म्हणजे आंत मनाच्या धर्मांचें बळ नाहींसें होतें. ११ (ते मनोधर्म कोणते तें ऐक) कल्पना खुंटते, मनाची हांव कमी होते, आणि मनोविकार आपोआप बंद पडतात; १२ भूक काय झाली, व झोंप कोणीकडे गेली त्यांची आठवण नाहींशी होऊन त्यांचा पत्ता देखील लागत नाहीं. १३ मूलबंधानें कोंडलेला अपानवायु माघारी फिरला, म्हणजे सहज वर अडकून फुगा धरतो. १४ तो क्षोभून बलवत्तर होतो, अडकलेल्या जागीं गुरगुरतो, आणि राहून राहून लिंगचक्राशीं धडका मारितो. १५ मग अशा रीतीनें माजलेली वावटळ चोहोंकडे पोटांत फिरून ढवळाढवळ करिते, आणि बालपणापासून सांचलेली कुजकी घाण बाहेर काढण्याचा प्रयत्न करिते. १६ तो वायु पोटांत तळाशीं न मुरडतां कोठ्यांत शिरतो, आणि कफपित्तांचा नाश करतो. १७ सप्त धातूंचीं स्थानें ओलांडतो, मेद चे डोंगर फोडतो, आणि हाडांतील रस बाहेर काढतो, १८ नाड्या सोडवतो, अवयवांना शिथिल करतो, आणि योगसाधन करणाराला भीति घालतो; परंतु त्यानें भिऊं नये. १९ तो व्याधि उत्पन्न करतो, आणि लागलीच नाहींशी करतो, व कफ वगैरे ओलसर पदार्थ आणि मांस वगैरे जड पदार्थ हे एकत्र करतो; २२० अर्जुना, दुसरीकडे काय प्रकार होतो म्हणशील, तर आसनाच्या उष्णतेनें कुंडलिनी नांवाची शक्ति जागी होते. २१ नागिणीचें पिलें यांजला कुंकवानें न्हाहावयास घालून तें जसें वेटोळें करून निजतें, २२ त्याप्रमाणें ती कुंडलिनी लहानशे साडेतीन वेढे घालून

मुख सर्पिणी । निदेली असे ॥ २३ ॥ विद्युल्लतेची विडी । वन्हिज्वाळांची घडी । पंधरेयाची[1] चोखडी । घोंटीव जैशी ॥ २४ ॥ तैसी सुबंध आटली । पुंटीं[2] होती दाटली । ते वज्रासनें चिमुटली[3] । सावधु होय ॥२५॥ तेथ नक्षत्र जैसें उलंडलें । कीं सूर्याचें आसन मोडेलें[4] । तेजाचें बीज विरूढलें[5] । अंकुरेंशीं ॥२६॥ तैसी वेढियातें सोडिती । कवतिकें आंग मोडिती । कंदावरी[6] शक्ती[7] । उठिली दिसे ॥ २७ ॥ सहजें बहुतां दिवसांची भूक । वरि चेववि ली तें होय मिष । मग आवेशें पसरी मुख । ऊर्ध्व उजू ॥ २८ ॥ तेथ हृदयकोशातळवटीं[8][9] । जो पवनु भरे किरीटी । तया सगळेयाचि मिठी । देऊनि घाली ॥२९॥ मुखींच्या ज्वाळीं । तळीं वरी कवळी । मांसाची वेंडवाळी[10] । आरोगूं[11] लागे ॥ २३० ॥ जे जे ठाय समांस । तेथ औहाच[12] जोडे घोंडस[13]। पाठी एकदोनी घांस । हियाही भरी ॥ ३१ ॥ मग तळवे तळहात शोधी । ऊर्ध्वांचे खंडें[14] भेदी । झाडा घे संधी । प्रत्यंगाचा[15] ॥३२॥ अधोभाग तरी न संडी । परि नखींचेंही सत्व काढी । त्वचा धुवूनि जडी । पांजरेशीं[16] ॥ ३३ ॥ अस्थींचे नळे निरपे[17] । शिरांचे हीरें[18] वोरपे । तंव बाहेरी विरूढी[19] करपे । रोमबीजांची[20] ॥३४॥ मग सप्तधातूंच्या[21] सागरीं । ताहानेली घोंट भरी । आणि सवेंचि उन्हाळा करी । खडखडीत ॥३५॥ नासापुटौनि[22] वारा । जो जातसे अंगुळें बारा । तो गचिये[23] धरूनि माघारा । आंतु घाली ॥३६॥ तेथ अधरौतें[24] आकुंचे । ऊर्ध्व तळौतें[25] खाचे । तया खेवांमाजि[26] चक्राचे । पेंदर[27] उरती ॥३७॥ येन्हवीं तरी दोन्ही[28] तेव्हांचि मिळती । परी कुंडलिनी नावेक दुश्चित्तें[29] होती । ते तयातें म्हणे परौती । तुम्हीचि काय एथें ॥ ३८ ॥ आयकें पार्थिवें[30] धातु आघवी । औरोगितां[31] कांहीं नुरवी । आणि आपातें तंव ठेवी । पुसोनियां ॥३९॥ ऐसी दोनी[32] भूतें खाये । ते वेळीं संपूर्ण धौये[33] । मग सौम्य होऊनि राहे । सुषुम्नेपाशीं[34] ॥२४०॥ तेथ तृप्तीचेनि संतोषें । गरळ जें वमी[35] मुखें । तेणें तियेचेनि [36]पीयूषें । प्राणु जिये[37] ॥४१॥ तो अग्नि[38] आंतूनि निघे । परि सबाह्य निववूंचि लागे । ते वेळीं कैसु[39] बांधिती अंगें । सांडिली पुंढती[40] ॥४२॥ मार्ग मोडिती नाडीचे । नवें[41]विधपण वायूचें । जाय म्हणऊनि शरीराचे । धर्मु नाहीं ॥४३॥ इडा[42] पिंगळा[43] एकवटती । गांठी तिन्ही[44] सुटती । साही पदर फुटती । चक्रांचे हे ॥४४॥ मग शशी आणि भानु । ऐसा कल्पिजे जो अनुमानु । तो वातीवरी पवनु । गिंवसितां न दिसे ॥ ४५ ॥ बुद्धीची फुलिकी[45] विरे । परिमळु घ्राणीं उरे । तोही शक्तीसवें[46] संचरे । मध्यमेमाजीं[47] ॥ ४६ ॥ तंव वरिलेकडोनि ढाळें[48] । चंद्रामृतींचें[49] तळें । कांनवडोनि[50] मिळे । शक्तिमुखीं[51] ॥४७॥ तेणें नाळकें[52] रस भरे । तो सर्वांगामाजि संचरे । जेथिंचा तेथ मुरे । प्राणपवनु[53] ॥४८॥ तांतलिये[54] मुसें । मेण निघोनि जाय जैसें । मग कोंदली[55] राहे रसें । वोतलेनि ॥ ४९ ॥ तैसें पिंडाचेनि[56] आकारें । ते कळाचि[57] कां अवतरे । वरि त्वचेचेनि पदरें[58] । पांगुरली असे ॥२५०॥ जैसी

१ सोन्याची. २ नाभिस्कंधांत. ३ पेंचांत सांपडली. ४ तुटून पडलें. ५ उगवलें. ६ नाभीवर. ७ कुंडलिनी. ८ कमळ. ९ खालीं. १० घांस. ११ खाऊं लागे. १२ सहज. १३ ग्रास. १४ भाग. १५ प्रत्येक अवयवाचा. १६ हाडांच्या सांपळ्यास. १७ आंतून साफ करते. १८ गाभे. १९ वाढ; वृद्धि. २० केसांच्या मुळांची. २१ रस, रक्त, मांस, मेद, आस्थि, मज्जा व शुक्र या शरिरांतील सात धातु. २२ नाकपुड्यांतून. २३ गच्च प्राणास धरून. २४ खालचें वर ओढते. २५ वरचें खालीं खचतें. २६ आलिंगनामध्यें. २७ सांगाडा. २८ प्राण व अपान. २९ घाबरी होते. ३० पृथ्वीसंबंधी. ३१ भक्षितां. ३२ पृथ्वी, अप्. ३३ तृप्त होते. ३४ इडा व पिंगळा यांचेमधील नाडी. ३५ ओके. ३६ अमृतानें. ३७ वांचे. ३८ विषरूप अग्नि. ३९ सामर्थ्य. ४० पूर्वी. ४१ अपान, समान, उदान, व्यान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय. ४२ डाव्या नाकपुडींतील नाडी. ४३ उजव्या नाकपुडींतील नाडी. ४४ आधारचक्र, नाभिचक्र, हृदयचक्र. ४५ टिकली; चमक. ४६ कुंडलिनी. ४७ सुषुम्ना. ४८ हळूच. ४९ सत्रावीचें. ५० एका अंगावर कलून. ५१ कुंडलिनीचे मुखीं. ५२ त्या बाजूचे नळीनें. ५३ प्राणवायु. ५४ तापलेल्या. ५५ गच्च भरलेली. ५६ शरिराच्या. ५७ कांति. ५८ पडद्यानें.

खालीं तोंड करून सर्पाप्रमाणें निजलेली असते. २३ ती विजेच्या कंकणाप्रमाणें, किंवा अग्निज्वालेच्या घडी प्रमाणें अथवा घोटून चकचकीत केलेल्या सोन्याच्या वेळ्याप्रमाणें, २४ नाभिस्कंदांत जी दाटून बसलेली असते, ती मूळबंधाच्या चिमट्यानें जागी होते. २५ तेव्हां, नक्षत्र तुटून पडतेवेळीं जसें चकाकतें किंवा सूर्याचें आसन ढळावें अथवा तेजाचें बीं पेरून त्याला जसा अंकुर यावा, २६ त्याप्रमाणें ती कुंडलिनी आपले वेढे सोडून कौतुकानें आळस देऊन नाभीवर उभी राहिलेली दिसते. २७ ती सहजच फार दिवसांची भुकेलेली; त्यांत तिला जागें केल्याचें निमित्त झाल्यामुळें मग आवेशानें तोंड उघडून ती वर नीट उभी राहते. २८ हे किरीटी, तेव्हां, हृदयकमलाच्या खालीं जो वारा भरलेला असतो, त्यास गळ्याला ती कवटाळून मिठी घालते; २९ आणि मुखांतील ज्वालांनां खालवरचें मांसादिकांचे घांस करून खाऊं लागते. २३० ज्या ठिकाणीं मांस असेल, त्याचा सहज घांस घेते, आणि मागाहून त्या राहिलेल्या भागाचेही घांस घेते. ३१ मग पायांचे तळ व हातांचे तळ यांचें शोधन करून वरील अंगाचा भेद करिते, आणि दरएक अंगाचा व सांध्याचा झाडा घेते. ३२ आपली मूळ जागा न सोडतां नखांतीलही सत्त्व काढते, व त्वचा धुऊन हाडांच्या व शिरांच्या सांपळ्यास मिळविते. ३३ अस्थींच्या नळ्यांतील रस काढून शिरांचे गाभे ओरपून टाकिते, त्या योगानें बाहेरील केसांच्या मुळांची वाढ करपून जाते. ३४ नंतर, सप्तधातूंच्या सागरांत आपली तहान भागविते, आणि त्याबरोबर जिकडे तिकडे शरीर खडखडीत कोरडें करून टाकिते. ३५ नाकपुड्यांतून जो बारा बोटें वाहणारा वारा, त्या प्राणवायूस गच्च धरून आंत ओढते. ३६ त्या वेळेस प्राण व अपान हे दोन वायु आकुंचित होतात, व प्राण अपानास दाबून धरतो, आणि त्या दोघांच्या आलिंगनामध्यें चक्रांचे सांगाडे उरतात. ३७ प्राण व अपान वायु हे दोन्ही त्याच वेळेस एके ठिकाणीं मिळाले असते; परंतु ती कुंडलिनी क्षणभर घाबरी होऊन "तुम्ही माघारे जा, तुमचें काय काम?" असें त्यांना म्हणते. ३८ अर्जुना, ऐक. शरिरांतील सर्व पृथ्वीचा भाग खाऊन टाकून कांहीं शिलक ठेवीत नाहीं, व तसाच उदकाचा भाग सर्व चाटूनपुसून टाकते. ३९ अशा रीतीनें दोन्ही भूतांचा भाग खाऊन तृप्त झाल्यावर मग सौम्य होऊन स्वस्थपणें सुषुम्ना नाडीपाशीं राहते. २४० त्या ठिकाणीं तृप्तीच्या भरांत ती मुखांतून जी गरळ ओकते, त्या गरळरूपी अमृताच्या योगानें प्राण रक्षण होतात. ४१ ती गरळरूप अग्नि बाहेर निघून सर्व अंगांतील दाह शमवितो; त्यामुळें अंगांतील पूर्वी गेलेलें सामर्थ्य फिरून येऊं लागतें. ४२ नाडीचें वाहणें बंद होतें, व नऊ वायूंचे व्यापार बंद होतात, म्हणून शरिराचे धर्म राहत नाहींत. ४३ इडा व पिंगळा ह्या एक होतात, तिन्ही गांठी सुटतात आणि साही चक्रांचे संबंध नाहींतसे होतात. ४४ मग, चंद्र आणि सूर्य अशीं ज्या वायूला नांवें आहेत, तो दिव्याच्या उजेडानें पाहूं गेलें असतां दिसत नाहीं. ४५ बुद्धीची ज्ञानकळा जागचे जागीं नाहींशी होते, आणि नाकामध्यें उरलेला सुगंधही कुंडलिनीबरोबर सुषुम्नेंत जातो. ४६ त्या वेळीं, भ्रुकुटीचक्रामध्यें जें चंद्रामृताचें तळें आहे, त्याला हळूच धक्का बसून तें वाकडें होतें, व त्यांतील अमृत कुंडलिनीच्या मुखांत पडूं लागतें. ४७ त्यामुळें तिच्यांत रस भरून तो सर्वांगांत पसरतो, आणि तो प्राणवायूनें जेथच्या तेथेंच मुरतो. ४८ तापलेल्या मुशींतील मेण नाहीसें होऊन ती ज्याप्रमाणें ओतलेल्या रसानें गच्च भरून राहते, (मुशीचा आकार रसाला येतो,) ४९ त्याचप्रमाणें, तें शरीर इतकें तेजस्वी दिसतें कीं, जणू काय मूर्तिमंत तेजच त्या ठिकाणीं अवतरलें आहे! २५० सूर्य अभ्राच्या बुरख्यांत दडून राहिलेला असतो; परंतु तेंच आभाळ नाहींसें झाल्यावर तो ज्या..

आभाळाची बुंथी[1] । करूनि राहे गभस्ती[2] । मग फिटलीया[3] दीप्ती । धरून ये ॥५१॥ तैसा आहाचि[4]वरि कोरडा । त्वचेचा असे पातोडा[5] । तो झडोनि जाय कोंडा । जैसा होय ॥५२॥ मग काश्मीरीचे[6] स्वयंभ । कां रत्नबीजा निघाले कोंभ । अवयवकांतीची भांब[7] । तैसी दिसे ॥ ५३ ॥ नातरी संध्यारागींचे[8] रंग । काढूनि वळिलें तें आंग । कीं अंतर्ज्योतीचें[9] लिंग । निर्वाळिलें[10] ॥ ५४ ॥ कुंकुमाचें भरींव । सिद्धरसाचें[11] वोतींव । मज पाहतां सावेव[12] । शांतिचि ते ॥५५॥ तें आनंदचित्रींचे लेपें[13] । नातरी महासुखाचें[14] रूप । कीं संतोषतरूचें रोप । थांवलें[15] जैसें ॥ ५६ ॥ तो कनकचंपकाचा[16] कळा । कीं अमृताचा पुतळा । नाना सासिनला[17] मळा । कोंवळिकेचा[18] ॥५७॥ हो कां जे शारदियेचेनि[19] वोलें । चंद्रबिंब पाल्हेलें[20] । कां तेजचि मूर्त बैसलें । आसनावरी ॥५८॥ तैसें शरीर होये । जे वेळीं कुंडलिनी चंद्रें[21] पिये । मग देहाकृति बिहे[22] । कृतांतु[23] गा ॥५९॥ वार्धक्य तरी बहुडे[24] । तारुण्याची गांठी विघडे । लोपली उघडे । बाळदशा ॥ २६० ॥ वयसा[25] तरी येतुलेवरी[26] । येऱ्हवीं बाळाचा बळार्थु[27] करी । धैर्याची थोरी । निरूपमु ॥ ६१ ॥ कनकद्रुमाच्या[28] पालवीं । रत्नकळिका नित्य नवी । नखें तैसीं बरवीं । नवीं निघती ॥ ६२ ॥ दांतही आन[30] होती । परि अपाडें[31] सानेजती । जैसी दुबाहीं[32] बैसे पांती[33] । हिरेयांची ॥६३॥ माणिकुळियांचिया[34] कणिया । सांवियाचि[35] अणुप्रमाणिया । तैसिया सर्वांगीं उधवती[36] अणियें[37] । रोमांचिया ॥ ६४ ॥ करचरणतळें । जैशीं का रातोत्पलें[38] । पाखाळींव[39] होती डोळे । काय सांगों ॥ ६५ ॥ निडारा[40]चेनि कोंदाटें । मोतियें नावरती संपुटें[41] । मग शिवणी[42] जैसी उतटे[43] । शुक्ति[44]पल्लवांची ॥६६॥ तैसी पातियांचिये[45] कवळिये न सामाये[46] । दिठी जांकळोनि[47] निघों पाहे । आंधिलीचि[48] परी होये । गगना कवळिती ॥ ६७ ॥ आइकें देह होय सोनियाचें । परि लाघव[49] ये वायूचें । जे आप आणि पृथ्वीचे । अंशु नाहीं ॥६८॥ मग समुद्रापैलीकडील देखे । स्वर्गींचा आलोचु[50] आइके । मनोगत वोळखे । मुंगियेचें ॥६९॥ पवनाचा वारिका[51] वळघे[52] । चाले तरी उदकीं पाउल न लागे । येणें येणें प्रसंगें । येती बहुता सिद्धि ॥२७०॥ आइकें प्राणाचा हात धरुनी । गगनाची[53] पाउठी[54] करुनी । मध्यमेचेनि[55] दादराहुनी[56] । हृदया[57] आली ॥७१॥ ते कुंडलिनी जगदंबा । जे चैतन्यचक्रवर्तीची[58] शोभा । जया विश्वबीजाचिया[59] कोंभीं[60] । साउली केली ॥ ७२ ॥ जे शून्यलिंगाची[61] पिंडी[62] । जे परमात्मया शिवाची करंडी[63] । जे प्रणवाची[64] उघडी । जन्मभूमी ॥ ७३ ॥ हें असो. ते कुंडलिनी बाळी[65] हृदयाआंतु आली । तंव अनुहताची[66] बोली । चावळे[67] ते ॥ ७४ ॥ शक्तीचिया आंगा लागलें । बुद्धीचें चैतन्य होतें जाहलें । तें तेणें आइकिलें । अळुमाळु[68] ॥७५॥ घोषांच्या[69] कुंडीं । नादचित्रांचीं[70] रूपडीं । प्रणवाचिया[71] मोडी[72] । रेखिलीं ऐसीं ॥७६॥ हेंचि कल्पावें तरी जाणिजे । परि कल्पितें[73] कैचें आणिजे । तरी नेणों काय गाजे[74] । तिये ठायीं ॥७७॥ विसरोनि गेलों अर्जुना । जंव नाशु नाहीं पवना । तंव वाचा आथी गगना[53] । म्हणऊनि घुमे[75] ॥ ७८ ॥ तया अनाहताचेनि[66] मेघें । आकाश दुमदुमों लागे । तंव ब्रह्मस्थानींचें वेगें[76] । सहज फिटे[77] ॥७९॥ आइकें कमळगर्भाकारें । जें महदाकाश दुसरें । जेथ चैतन्यें आधांतुरें[78] । करूनि असिजे

१ बुरखा. २ सूर्य. ३ नाहांसें झाल्यावर. ४ उगाच. ५ पापुद्रा. ६ केशर. ७ झांक. ८ संध्याकाळच्या आकाशाचे. ९ आत्मचैतन्य. १० बनविलें. ११ अमृत. १२ मूर्तिमंत. १३ रंग. १४ ब्रह्माचें. १५ वळावलेलें. १६ सोनचांफ्याचा. १७ भरास आला. १८ नाजुकपणाचा. १९ शरदृतूचें. २० पसरलें. २१ अमृत. २२ भय पावतो. २३ यम. २४ मागें फिरे. २५ वयानें. २६ येथवर. २७ पराक्रम. २८ सुवर्णवृक्षाच्या. २९ दुसरे. ३० अपूर्व. ३१ लहान होतात. ३२ दोन बाजूंनीं. ३३ पंक्ति. ३४ माणकांच्या. ३५ सहज. ३६ उद्भवतात. ३७ अग्रें. ३८ लाल कमळें. ३९ स्वच्छ. ४० फुगीरपणा ४१ शिंपल्याचा जोड. ४२ सांधा. ४३ उकलती. ४४ शिंप, ४५ पापण्यांच्या. ४६ मावे. ४७ व्यापून. ४८ पहिलीच. ४९ कर्तबगारी. ५० नाद; मसलत. ५१ घोडा. ५२ चढे. ५३ हृदयाकाश. ५४ पायरी. ५५ सुषुम्नेचे. ५६ जिना. ५७ आत्मस्वरूपाजवळ. ५८ जीवात्म्याची. ५९ ॐकार. ६० जीव. ६१ निराकार ब्रह्माची. ६२ साकारमूर्ति. ६३ संवळी; संपुष्ट. ६४ ॐकाराची. ६५ कोमळ. ६६ अखंड ॐकाराचा ध्वनि. ६७ बोलूं लागे. ६८ किंचित. ६९ शब्द. ७० अक्षरचित्र. ७१ ॐकार. ७२ आकार. ७३ कल्पना करणारें. ७४ गर्जे. ७५ शब्द करी. ७६ खिडकी. ७७ उघडे. ७८ अधांतरी.

प्रमाणें आपले तेजानें वर येतो, ५१ त्याचप्रमाणें, शरिरावर त्वचेचा जो उगाच पापुद्रा असतो, तो कोंड्याप्रमाणें निघून जातो. ५२ मग केशराच्या स्वयमेव रंगासारखा, अथवा रत्नरूप बीजाला निघालेल्या कोंबासारखी त्या अवयवकांतीची झांक दिसते. ५३ नाहींतर संध्याकाळच्या आकाशाच्या रंगाची लाली काढून तें अंग बनविलें असावें काय, अथवा आत्मचैतन्याच्या तेजाचें लिंग केलें असावें, ५४ किंवा तें कुंकुमानें भरलेलें आणि आत्मरसानें ओतलेलें, अथवा ती मूर्तिमंत शांतिच असावी असें मला वाटतें. ५५ तें आनंदरूपी चित्राचा रंग, किंवा परब्रह्म सुखाचें रूप, अथवा संतोषरूपी वृक्षाचें रोप आहे असें भासतें. ५६ तो सोनचांफ्याचा कळा किंवा अमृताचा पुतळा, अथवा नाजुकपणाचा भर आलेला असा मळाच. ५७ शरदृतूच्या पौर्णिमेच्या ओलाव्यानें चंद्रबिंब शोभावें, किंवा जणू काय मूर्तिमंत तेजच आसनावर बसावें, ५८ त्याप्रमाणें, कुंडलिनी चंद्रामृताच्या तळ्यांतलि अमृत प्याल्यावर शरीर दिसूं लागतें. मग त्या शरिराला यम देखील भितो ! ५९ वृद्धपणा मागें फिरतो, तारुण्याची जत्रानी मोडते, आणि गेलेली बाल्यावस्था पुनः प्राप्त होते. २६० वयानें पाहिलें तरी एवढासाच दिसतो; परंतु, अतिशय पराक्रम करतो, व त्याचें धैर्य अनुपम असतें. ६१ सुवर्णवृक्षाच्या पालवींतून रत्नाची कळी सतत नवी निघावी, त्याप्रमाणें नवीं नखें निघून सतेज दिसतात ६२ दांतही दुसरे होतात, परंतु अतिशय बारीक बनतात–जणू काय दोही बाजूंला हिऱ्यांच्या पंक्तीच मांडल्या आहेत ! ६३ सर्व अंगावरील रोमांचीं अग्रें माणकांच्या कण्याप्रमाणें लहान अशीं सतेज उद्भवतात. ६४ हातपायांचे तळवे कमळाप्रमाणें लाल बनतात, आणि डोळे स्वच्छ होतात. आणखी काय सांगावें ! ६५ मोत्यें पक्कदशेला येऊन फुगल्याकारणानें शिंपींत मात नाहींत–म्हणून शिंपीचा सांधा उकलतो, ६६ त्याप्रमाणें दृष्टि पापण्यांच्या कवळींत न मावतां लांबवर पोहोंचून बाहेर येऊं पाहते. ती दृष्टि पहिलीच खरी, परंतु सगळ्या गगनाला व्यापते. ६७ अर्जुना, ऐक. देहाची सुवर्णासारखी कांति होते. परंतु तो सर्व वायुमय असतो. त्यांत अप् आणि पृथ्वी यांचा अंशही नसतो. ६८ मग त्याला समुद्रापलीकडीलही वस्तु दिसतात, स्वर्गीतलि मसलती समजतात, व मुंगीच्याही मनांतलि भाव ओळखतां येतात. ६९ तो वाऱ्याच्या घोड्यावर स्वार होतो, पाण्यावर चालतांना पाण्याला पाय लागत नाहींत, अशा प्रकारें प्रसंगानुसार त्याला पुष्कळ सिद्धि प्राप्त होतात. २७० पहा कीं, प्राणवायूचा हात धरून व हृदयाकाशाच्या पायऱ्या करून सुषुम्नेच्या जिन्यानें हृदयांत आलेली, ७१ व जीवात्म्याला शोभा देणारी जी कुंडलिनी जगदंबा, ती जगद्बीजाचा कोंब ( गाभा ) जो जीव त्याच्यावर सावली करते. ७२ जी निराकार ब्रह्माची साकारमूर्ति, जी परमात्म्या शिवाची संबळी, जी ॐकाराची केवळ जन्मभूमिच, ७३ आणखी काय सांगावें ? ती कुंडलिनी बाळी हृदयांत आली म्हणजे अखंड ॐकाराचा ध्वनि होऊं लागतो. ७४ त्या कुंडलिनीच्या जवळ बुद्धि असल्यामुळें तिच्या कानावर किंचित् ॐकाराचा ध्वनि जातो. घोषाच्या कुंडांत ध्वनि व नादरूपी ॐकाराच्या आकाराची रेखलेलीं अशीं रूपें उमटतात. ७६ या गोष्टी कल्पनेनेंच जाणतां येतात, परंतु कल्पना करणारा कोठून आणावा ? (कारण, त्याचें जीवात्म्याशीं ऐक्य झालें असतें. ) म्हणून त्या हृदयाकाशांत कसली गर्जना होते ती कांहीं समजत नाहीं. ७७ अर्जुना, मी तुला एक गोष्ट सांगण्याचो विसरलों. ती कोणती, तर जोंपर्यंत प्राण, अपान वगैरे वायूंचा नाश होत नाहीं, तोंपर्यंत हृदयाकाशाला वाचा असते, आणि म्हणूनच शब्द उत्पन्न होतो ७८ त्या अखंड ॐकाराच्या मेघाप्रारख्या ध्वनीनें हृदयाकाश दुमदुमूं लागतें, तेव्हां ब्रह्मरंध्राची खिडकी सहज उघडते. ७९ पहा कीं, कमळांतील पोकळीप्रमाणें हृदयाकाशांत जी पोकळ जागा असते, तेथें चैतन्य हें अधांतरीं वास

॥२८०॥ तया हृदयाच्या परिवरीं[1]। कुंडलिनिया परमेश्वरी । तेजाची शिदोरी[2] । [3]विनियोगिली ॥८१॥ बुद्धीचेनि शाकें । हांतबोनें[4] निकें । द्वैत तेथ न देखे । तैसें केलें ॥ ८२ ॥ निजकांती[5] हारविली। मग प्राणुचि[6] केवळ जाहली। ते वेळीं कैसी गमली। म्हणावी पां ॥८३॥ हो कां जे पवनाचि पुतळी। पांघुरली होती सोनसळी। ते फेडूनियां वेगळी। ठेविली तिया ॥ ८४ ॥ नातरी वायूचेनि आंगें झगटली। दीपाची दिठी निवटली। कां लखलखोनि हारपली। वीजु गगनीं ॥ ८५ ॥ तैसी हृदयकमळवेन्हीं[10]। दिसे जैसी सोनियाची सरी[11]। नातरी प्रकाशजळाची झरी। वाहत आली ॥८६॥ मग ते हृदयभूमी पोकळे[12]। जिराली कां एके वेळे। तैसें शक्तीचें रूप मावळे। शक्तीचिमाजी ॥८७॥ तेव्हां तरी शक्तीचि म्हाणिजे। येऱ्हवीं तो प्राणु केवळ जाणिजे। आतां नादबिंदु[13] नेणिजे। कळाज्योती ॥८८॥ मनाचा हन मारु। कां पवनाचा आधारु। ध्यानाचा आदरु। नाहीं परी ॥ ८९ ॥ हे कल्पना घे सांडी। ते नाहीं इये परवडी[14]। हे महाभूतांची फुंडी[15]। आटणी[16] देखा ॥२९०॥ पिंडें पिंडाचा ग्रासु। तो हा नाथसंकेतींचा[17] दंशु[18]। परि दाऊनि गेला उद्देशु। श्रीमहाविष्णु॥९१॥ तया ध्वनिताचें केणें[19] सोडुनी। यथार्थाची घडी झाडुनी। उपलविली[20] म्यां जाणुनी। ग्राहीक[21] श्रोते॥९२॥

**युंजन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः ।**
**शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति १५**

**अन्वय**—एवं सदा आत्मानं युंजन् नियतमानसः योगी निर्वाणपरमां मत्संस्थां शांतिं अधिगच्छति. ॥ १५ ॥

ऐकें शक्तीचें तेज जेव्हां लोपे। तेथ देहाचें रूप हारपे। मग तो डोळ्यामाजि लपे। जगाचिया ॥ ९३ ॥ येऱ्हवीं आंधिलाचिएंस[22]। सावयव तरी दिसे। परी वायूचें कां जैसें। वळिलें होय ॥ ९४ ॥ नातरी कर्दळीचा गाभा। [23]बुंथी सांडोनि उभा। कां अवयवचि नभा। उदयला तो ॥ ९५ ॥ तैसें होय शरीर। तैं तें म्हणिजे खेचर[24]। हें पदं[25] होतां चमत्कार। पिंडजनां[26] ॥ ९६ ॥ देखें साधकु निघोनि जाये। मागां पाउलांची वोळ राहे। तेथ ठायीं ठायीं होये। [27]अणिमादिक ॥ ९७ ॥ परि तेणें काय काज आपणपयां। अवधारीं ऐसा धनंजया। लोप आथी भूतत्रया[28]। देहींच्या देहीं ॥ ९८ ॥ पृथ्वीतें आप विरवी। आपातें तेज जिरवी। तेजातें पवनु हरवी। हृदयामाजीं ॥९९॥ पाठीं आपण[29] एकला उरे। परि शरीराचेनि अनुकारें[30]। मग तोही निगे अंतरें। [31]गगना मिळे ॥३००॥ ते वेळीं कुंडलिनी हे भाष जाये। मग मारुत्[32] ऐसें नाम होये। परि शक्तिपण तें आहे। जंव न मिळे शिवीं[33] ॥१॥ मग जालंधरें[34] सांडी। ककारांत[35] फोडी। गगनाचिये पाहाडीं[36]। पैठी[37] होय ॥२॥ ते ॐकाराचिये पाठी। पाय देत उठाउठी। पश्यंतीचिये[38] पाउठी[39]। मागां घाली ॥३॥ पुढें तन्मात्रा[40] अर्धवरी। आकाशाच्या[41] अंतरीं। भरती गमे सागरीं। सरिता जेवीं ॥ ४ ॥ मग ब्रह्मरंध्रीं[42] स्थिरावोनी। सोहंभा[43]वाच्या बाह्या पसरुनी। परमात्मलिंगा[44] धांवोनी। आंगा घडे ॥ ५ ॥ तंव महाभूतांची जवनिका[45] फिटे। मग दोहींसि[46] होय झटें[47]। तेथ गगनासकट आटे। समरसीं[48] तिये ॥६॥ पैं मेघाचेनि मुखीं निवडला[49]। समुद्रु कां वोघीं पडिला। तो मागुता जैसा आला। आपणपयां ॥ ७ ॥ तेवीं पिंडांचेनि[50] मिषें। पदीं[51] पद प्रवेशे। तें एकत्व होय तैसें। पंडुकुमरा ॥ ८ ॥

---

१ गुप्तस्थानीं. २ मेजवानी; फराळ. ३ अर्पण केली ४ नैवेद्य. ५ तेज. ६ वायु. ७ गर्भसुती वस्त्र. ८ लागली. ९ झांकली. १० पर्यंत. ११ जाड कांब. १२ पोकळीमध्यें. १३ मध्यमा वाचा; ध्वनि. १४ प्राप्तीपर्यंत. १५ खरोखर. १६ निर्मळपणा. १७ शिव. १८ सिद्धांत. १९ गाठोडें. २० विस्तारिली. २१ गिऱ्हाइक. २२ अगोदरचा. २३ सोपट. २४ आकाशांत संचार करणारे. २५ स्वरूप. २६ लोकांत. २७आणिमादिक अष्टसिद्धि. २८ पृथ्वी, अप्, तेज. २९ वायु. ३० आकारें. ३१ आकाशाला—ब्रह्मरंध्राला. ३२ वायु. ३३ ब्रह्मांत ३४ जालंधर नामक बंध. ३५ काकीमुख. ३६ पर्वतावर. ३७ प्रवेश करते. ३८ पश्यंति नांवाची दुसरी वाचा. ३९पायरी. ४० अर्धचंद्र मात्रा. ४१ आत्माकाशाच्या. ४२ मस्तकाच्या पोकळींत. ४३ मी परमात्मा ह्या भावाच्या. ४४ परब्रह्माचें चिन्ह. ४५ पडदा. ४६ शिवशक्तींस. ४७ ऐक्य. ४८ ब्रह्मानंदांत ४९ भिन्न जाहाला. ५० देहाचे. ५१ ब्रह्मपदीं.

करितें (पूर्ण नसतें. ) २८० त्या आत्म्याच्या घरीं कुंडलिनी परमेश्वरी पाहुणी आल्यावर तेजरूपाची मेजवानी दिली. ८१ त्या वेळेस बुद्धिरूप भाजीसह ताट वाढून-कीं ज्यांत द्वैताचा भास देखील होऊं नये-अशी मेजवानी दिली. ८२ कुंडलीनी आपली तेजरूप कांति टाकून वायुरूप बनली, त्या वेळीं कशी दिसली म्हणाल, तर प्रत्यक्ष वाऱ्याची पुतळी जी सोनसळा नेसली होती, तें ( वस्त्र ) फेडून तिनें एका बाजूस ठेवल्याप्रमाणें दिसली. ८४ किंवा, दिव्याची ज्योति वारा लागल्यानें ज्याप्रमाणें मालवते, अथवा वीज चमकून गगनांत नाहींशी होते, ८५ त्याप्रमाणें हृदयकमळापर्यंत जाऊन ती सोन्याच्या जाड कांबीसारखी सतेज, किंवा तेजरूप पाण्याच्या झऱ्याप्रमाणें वाहात आलेली दिसते. ८६ मग ती हृदयरूप भुसभुशीत भूमींत एकाएकीं जिरते, तेव्हां कुंडलिनीशक्तीचें रूप शक्तींतच लय पावतें. ८७ अशी स्थिति झाल्यावर हिला शक्तिच म्हणावयाचें; येरवीं ती खरोखर प्राणच होय परंतु त्या वेळेस ध्वनि, कळा, ज्योति हीं नाहींतशीं होतात. ८८ नंतर मन जिंकणें, वायूचें अधर राहणें, किंवा ध्यान करणें, हींही नाहींतशीं होतात. ८९ आणि कल्पना घेणें व सोडणें ही खटपट नाहींशी होते. असे व्यापार बंद होतात, म्हणून कुंडलिनी ही केवळ पंचमहाभूतें आटण्याची मूस होय. ९० शरिरानें शरीर नाहीसें करणें हा, योगशास्त्राचे नाथ जे शंकर, त्यांनीं केलेल्या सिद्धांताचा अभिप्राय होयः त्याचा श्रीमहाविष्णूंनीं हेतु दर्शित केला. ९१ [ ज्ञानेश्वर म्हणतातः-] त्या महाविष्णूंच्या संकेताचें गाठोडें सोडून व यथार्थरूप वस्त्राची घडी झाडून, श्रोते हेच या मालाचे गिऱ्हाईक आहेत असें जाणून मीं ती त्यांच्यापुढें मांडून ठेविली. ९२

**अशा प्रकारें सर्वकाल आपलें अंतःकरण समाधीचे ठिकाणीं लावून मनाचा निग्रह करणाऱ्या योग्याला, मोक्ष हेंच जिचें परम फळ आहे अशी माझ्या स्वरूपीं असणारी शांति प्राप्त होते. ॥१५॥**

पहा कीं, ज्या वेळेस शक्तीचें तेज नाहीसें होतें, त्यावेळेस देहाचें रूप नाहींसें होतें, आणि तो योगी इतकें सूक्ष्म रूप धारण करितो कीं, त्याला जगाच्या डोळ्यांतही लपतां येते. ९३ येरवीं तें शरीर पूर्वीप्रमाणेंच सावयव असतें, परंतु तें केवळ वायूचेंच असतें. ९४ किंवा केळीचीं सोपटें काढून त्याचा गाभा उभा केला म्हणजे जसें कांहींच उरत नाहीं, किंवा आकाशालाच जसे अवयव फुटावे, तसे त्याचे अवयव असून नसल्याप्रमाणें असतात, ९५ त्याचप्रमाणें शरीर बनल्यावर त्यालाच आकाशांत संचार करणारा असें म्हणतात; आणि याप्रमाणें स्वरूप बनल्यावर त्याचा देह लोकांत आश्चर्यकारक दिसतो. ९६ पहा, योग साध्य करणारा साधक चालून गेल्यावर पाठीमागें पावलें उमटतात, त्या प्रत्येक पावलाच्या ठिकाणीं अणिमादिक सिद्धि हात जोडून उभ्या असतात. ९७ परंतु, धनंजया, ऐक; त्या अणिमादिक सिद्धींशीं आपल्याला काय करावयाचें आहे? पृथ्वी, अप्, व तेज या तीन भूतांचा देहांतल्या देहांतच लोप होतो. ९८ पृथ्वीला उदक विरवतें, उदकाला अग्नि जिरवितो, आणि हृदयांत अग्नीचा नाश वायु करतो. ९९ पाठीमागें एकटा वायु आपण उरतो, तो शरिराचे आकृतीनें असतो; पण तोही कांहीं वेळानें निघून ब्रह्मरंध्र आकाशांत जाऊन मिळतो. ३०० त्या वेळीं कुंडलिनी हें नांव जाऊन मग फक्त मारुत् (वायुमय) हें नांव प्राप्त होते. परंतु ती ब्रह्मांत मिळेपर्यंत तिची शक्ति कायम असतेच. १ मग जालंधरबंध सोडून काकीमुख ( कंठस्थान ) फोडून ब्रह्मरंध्र आकाशाचे पाहाडावर प्रवेश करते. २ ती ॐकाराचे पाठीवर पाय देऊन पश्यंति वाचेची पायरी मागें टाकिते. ३ पुढें ॐकारांतील अर्धवर्तुलाकार मात्रा मागें टाकून, ज्याप्रमाणें नदी सागराला मिळते, त्याप्रमाणें ती ब्रह्माकाशांत जाऊन मिळते. ४ नंतर मस्तकाच्या पोकळींत ( ब्रह्मरंध्रांत ) स्थिर होऊन, मी ब्रह्म आहें ह्या भावनेनें बाहु पसरून परब्रह्माला मिठी मारून एकवटते. ५ त्या वेळेस पंचमहाभूतांचा पडदा नाहींसा होऊन मग शिवशक्तीचें ऐक्य होतें, त्या ठिकाणीं ती आकाशासह ब्रह्मानंदांत मिळून जाते. ६ ज्याप्रमाणें समुद्राचें पाणी मेघांच्या द्वारें जाऊन नंतर जमिनीवर वर्षाव होऊन तें नदीमार्गानें पुनः समुद्रासच येऊन मिळतें, ७ त्याप्रमाणें, अर्जुना, देहाच्या निमित्तानें ब्रह्मपदीं जीवात्मा प्रवेश करितो तें एकत्वही समुद्राच्या पाण्याप्रमाणें होय....

आतां दुजें हन होतें । कीं एकचि हें आइतें । ऐशिये विवंचनेपुरतें । उरोचिना ॥९॥ गगनीं गगन लया जाये । ऐसें जें कांहीं आहे । तें अनुभवें जो होये । तो होऊनि[1] ठाके ॥ ३१० ॥ म्हणोनि तेथिंची मातु । न चढेचि बोलाचा हातु । जेणें संवादाचिया गांवाआंतु । पैठी कीजे ॥ ११ ॥ अर्जुना येऱ्हवीं तरी । इया अभिप्रायाचा जे गर्व धरी । ते पाहें पां वैखरी[2] । दुरी ठेली ॥१२॥ भ्रूलता[3] मोंगलीकडे । तेथ मकाराचें[4]चि आंग न मांडे । सडे[6]या प्राणा सांकडें[7] । गगना येतां ॥१३॥ पाठीं तेथेंचि तो भेसळला । तैं शब्दाचा देवो मावळला । मग तयाहि वरी ओंटु आविन्नला[8] । आकाशाचा ॥१४॥ आतां महाशून्याचिया[11] डोहीं । जेथ गगनासीचि थावो[12] नाहीं । तेथ तांगा[13] लागेल काई । बोलाचा इया ॥१५॥ म्हणूनि आखरांमाजि[14] सांपडे । कीं कानावरी जोडे । हें तैसें नव्हे फुडें । त्रिशुद्धी[15] गा ॥१६॥ जैं कहीं दैवें । अनुभविलें फावे[16] । तैं आपणचि हें ठांकावें[17] ॥ होऊनियां ॥ १७ ॥ पुढती[18] जाणणें तें नाहींचि । म्हणोनि असो किती हेंचि । बोलावें आतां वायांचि । धनुर्धरा ॥१८॥ ऐसें शब्दजात माघौतें सरे । तेथ संकल्पाचें आयुष्य पुरे । वाराही जेथ न शिरे । विचाराचा ॥ १९ ॥ जें उन्मनियेचें[19] लावण्य । जें तुर्येचें[20] तारुण्य । अनादि जें अगण्य । परमतत्त्व[21] ॥३२०॥ जें विश्वाचें मूळ । जें योगद्रुमाचें[22] फळ । जें आनंदाचें केवळ । चैतन्य[23] गा ॥२१॥ जें आकाराचा प्रांतु[24] । जें मोक्षाचा एकांतु[25] । जेथ आदि आणि अंतु । विरोनि[26] गेले ॥ २२ ॥ जें महाभूतांचें बीज । जें महातेजाचें तेज । एवं पार्था जें निज । स्वरूप माझें ॥ २३ ॥ ते हे चतुर्भुज कोंभेली[27] । जयाची शोभा रूपासि आली । देखोनि नास्तिकीं नोकिली[28] । भक्तवृंदें ॥२४॥ तें अनिर्वाच्य महासुख । पैं आपणचि जाहले ते पुरुष । जयांचे कां निष्कर्ष[29] । प्राप्तिवेरी ॥२५॥ आम्हीं साधन हें जें सांगितलें । तेंचि शरीरा जिहीं केलें । ते आमुचेनि पाडें[30] आले । निर्वाळलेयी[31] ॥२६॥ परब्रह्माचेनि रसें । देहाकृतीचियेनि मुसें । वोतींव जाहाले तैसे । दिसती आंगें ॥२७॥ जरि हे प्रतीति हन अंतरीं फांके । तरी विश्वाचि हें अवघें झांके । तव अर्जुन म्हणे निकें । साचाचि जी हें ॥२८॥ कां जे आपण आतां देवो । हा बोलिले जो उपावो । तो प्राप्तीचा ठावो । म्हणोनि घडे[32] ॥२९॥ इये अभ्यासीं जे दृढ होती । ते भरवसेंनि ब्रह्मत्वा येती । हें सांगतियाची रीती । कळलें मज ॥ ३३० ॥ देवा गोठीचि हे ऐकतां । बोधु[33] उपजतसे चित्ता । मा[34] अनुभवें तल्लीनता[35] । नोहेल केवीं ॥३१॥ म्हणऊनि एथ कांहीं । अनारिसें[36] नाहीं । परी नांवभरी[37] चित्त देईं । बोला एका ॥ ३२॥ आतां कृष्णा तुवां सांगितला योगु । तो मना तरी आला चांगु । परि न शकें करूं पांगु[38] । योग्यतेचा ॥३३॥ सहजें आंगिकें[39] जेतुलें आहे । तेतुलियाचि जरी सिद्धि जाये । तरी हाचि मार्ग सुखोपायें । अभ्यासीन ॥३४॥ नातरी देव जैसें सांगतील । तैसें आपणपें जरी न ठकेल[40] । तरी योग्यतेवीण होईल । तेंचि पुसों ॥३५॥ जीवींचिये ऐसी धारण[41] । म्हणोनि पुसावया जाहलें कारण । मग म्हणे तरी आपण । चित्त देइजो ॥३६॥ हांहो जी अवधारिलें । जें हें साधन तुम्हीं निरूपिलें । तें ओवडतयाहि[42] अभ्यासिलें । फावों[43] शके ॥३७॥ की योग्यतेवीण नाहीं । ऐसें हन आहे कांहीं । तेथ श्रीकृष्ण म्हणती काइ । धनुर्धरा ॥ ३८ ॥ हें कौज[44] कीर निर्वाणें[45] । परि आणिकही जें कांहीं साधारण ।

१ सिद्ध होतो. २ वैखरी नामक चौथी वाणी. ३ भ्रुकुटींच्या; भुंवयांच्या. ४ आंतील बाजूस. ५ तुर्यावस्था; ॐकारांतील तिसरी मात्रा. ६ एकट्या. ७ संकट. ८ दिवस. ९ आटणी. १० झाली. ११ अव्यक्त स्थितीच्या. १२ ठिकाण. १३ थांग. १४ अक्षरांमध्यें १५ त्रिवार सत्य १६ प्राप्त होणें. १७ रहावें. १८ नंतर. १९ उन्मनी नामक पांचवी अवस्था;—जिच्यांत मनाचा लय होतो. २० समाधीची तुर्या नामक चौथी अवस्था. २१ ब्रह्मस्वरूप. २२ योगरूप वृक्षाचें. २३ जीव. २४ शेवट. २५ केवळ स्थिति. २६ लय पावले. २७ आकाराला आली. २८ छळिलीं. २९ प्रयत्न. ३० योग्यतेनें. ३१ तयार झाल्यामुळें. ३२ ब्रह्मसाक्षात्कार होतो. ३३ ज्ञान. ३४ तर मग. ३५ तद्रूपता. ३६ मिथ्या. ३७ क्षणभर. ३८ उणीव. ३९ बळ. ४० प्राप्त होणार नाहीं. ४१ इच्छा. ४२ वाटेल त्याला देखील. ४३ प्राप्त होईल. ४४ कार्य. ४५ मोक्षाचें.

आरंभींचें वैभवच, अथवा वैराग्यरूप सिद्धीचा मूर्तिमंत अनुभवच आहे. ६२ किंवा हें संसार मोजण्याचें मापच, अथवा अष्टांगयोगसाहित्याचें बेटच होय. सुगंधानेंच ज्याप्रमाणें चंदनाचें रूप धारण करावें, ६३ त्याचप्रमाणें, साधकदशेच्या योगानें हा इतका योग धैर्ययुक्त झालेला असतो कीं, संतोषाचा पुतळा बनविल्यासारखा किंवा सिद्धीच्या भांडारांतून काढल्यासारखा दिसतो. ६४

**नियमानें प्रयत्न करणारा, सर्व पातकांपासून मुक्त झालेला, व अनेक जन्म हाच प्रयत्न करीत आलेला योगी परमगतीप्रत प्राप्त होतो. ॥४५॥**

कारण, कोट्यवधि वर्षांनीं हजारों जन्मांचा प्रतिबंध दूर करून तो आत्मसिद्धीच्या किनाऱ्यावर येऊन पोहोंचलेला असतो. ६५ म्हणून सर्व साधनें त्याला स्वभावतःच प्राप्त होतात; आणि मग सहजच तो विचाराच्या गादीवर बसतो. ६६ नंतर, विचार करण्यामध्यें प्रबल असा विवेकही मागें राहतो; आणि अविचारणीय असें जें ब्रह्म, तें तो स्वतांच होतो. ६७ त्या ठिकाणीं मनाचे ढग नाहींतसे होतात; प्राणवायूचें हालणें बंद होतें; व तो आपल्या ठिकाणींच चिदाकाशांत लीन होऊन ६८ ॐकाराच्या अर्धबिंदूत निमग्न होतो. अशा रीतीचें त्याला अवर्णनीय सुख प्राप्त होतें, म्हणून त्या ठिकाणीं बोलणेंच बंद होतें. ६९ मग, सगळ्या गतींना गति देणारी जी ब्रह्मस्थिति, त्या निराकार स्थितीचें रूपच तो बनून राहतो. ४७० त्यानें मागल्या अनेक जन्मांत, प्रतिबंध हाच कोणी पाण्यावरील मळ-तो झाडून टाकलेला असतो, म्हणून त्याची लग्नघटका त्याचा जन्म होतांच बुडते, ७१ आणि तद्रूपतेशीं शुभ लग्न होऊन तो अभिन्नत्व पावतो. अभ्रें नाहींतशीं झालीं म्हणजे ज्याप्रमाणें आकाशरूपच होऊन राहतात, ७२ त्याप्रमाणें (विक्षेपादि विघ्नें नाहींतशीं झालीं म्हणजे,) ज्यापासून विश्वाची उत्पत्ति होते, व ज्या ठिकाणीं तें पुनः लय पावते, तें ब्रह्म, तो या विद्यमान देहांत असतांनाच बनतो. ७३

**तप करणाऱ्याहून, ज्ञान्याहून व कर्म करणाऱ्याहून योगी अधिक श्रेष्ठ आहे, म्हणून, अर्जुना, तूं योगी हो. ॥ ४६ ॥**

ज्या लाभाच्या आशेनें कर्मनिष्ठ पुरुष आपल्या बाहुबलाच्या भरवशावर कर्ममार्गाच्या प्रवाहांत उडी घालतात, ७४ किंवा ज्या एका वस्तूसाठीं ज्ञानी पुरुष हे ज्ञानरूप कवच धारण करून समरांगणांत प्रपंचशत्रूशीं झगडतात, ७५ अथवा ज्याच्या प्राप्तीसाठीं तपस्वी लोक हे निराश्रित व निसरडे झालेल्या अशा तपोरूप पर्वताच्या तुटलेल्या कड्यवरून प्रवास करितात, ७६ जें भजन करणारांच्या भजनाचें अधिष्ठान, अशा प्रकारें सर्वांस पूज्य, ७७ आणि जें साधकांचें सिद्धतत्त्व, तें निर्वाण परब्रह्म तो स्वतांच बनतो. ७८ म्हणून, तो कर्मनिष्ठांना वंद्य व ज्ञान्यांना विचारणीय आणि तपस्व्यांचा मूळ तपोनाथ होय. ७९ हें पहा-जीव व परमात्मा यांच्या संगमाच्या ठिकाणीं त्याच्या मनाचें ऐक्य झाल्याकारणानें, तो देही असूनही अशा योग्यतेस पावतो. ४८० म्हणून, अर्जुना, याच कारणास्तव, 'तूं योगी हो.' असें मनापासून तुला मी नेहमीं सांगत असतों. ८१

**सर्व योग्यांमध्येंही, जो माझ्याशीं ऐक्य पावून श्रद्धेनें (ऐक्यबोधानें) मला भजतो, तो मला परममान्य आहे. ॥ ४७ ॥**

अरे, योगी म्हणजे देवांचा देव, माझें सर्व सुखाचें आगर, आणि केवळ माझा प्राण असें समज. ८२ त्याच्या ठिकाणीं भजन करणारा, भजनक्रिया व भज्य वस्तु ही भक्तीची त्रिपुटी सदोदीत राहते. ८३ हे सुभद्रापते, मग त्याच्या आणि माझ्या प्रीतीचें स्वरूप वर्णन करितां येत नाहीं. तर असें समज कीं, तो म्हणजे प्रत्यक्ष मीच. ८४ अशा रीतीनें जें प्रेमाचें ऐक्य झालेलें असतें, त्याच्या तुलनेला उपमा पाहिजे असली तर मी देह व तो आत्मा याशिवाय दुसरी उपमा नाहीं! ८५ संजय म्हणतोः-राजा, भक्तरूप चकोराचा चंद्र किंवा सर्व त्रिभुवनाचा राजा व गुणांचा समुद्र जो श्रीकृष्ण परमात्मा, तो असें बोलला. ८६ तेथें पार्थाला पूर्वीपासून योगाचें ऐश्वर्य ऐकण्याची आस्था होतीच, ती पुनः दुप्पट झाली असें यदुनाथानें मनांत जाणलें; ८७ आणि तें पाहून श्रीकृष्णाच्या मनांत सहज आनंद झाला कीं, मी जें सांगतों, तें प्रत्यक्ष पाहण्याचा अर्जुन हा आरसाच होय. तेव्हां आतां

पला । जे बोला आरिसा जोडला । तेणें हरिखें[1] आतां उपलवला[2] । निरूपील ॥ ८८ ॥ तो प्रसंगु आहे पुढा । जेथ शांत[3] दिसेल उघडा । तो पालें-विजेल[4] मुडा[5] । [6]प्रमेयबीजाचा ॥ ८९ ॥ जे सात्त्विकाचेनि वडपें[7] । गेलें आध्यात्मिक खरपें[8] । सहजें [9]निडोरले वाफे । [10]चतुरचित्ताचे ॥ ४९० ॥ वरी अवधानाचा वाफसा[11] । लाधला सोनयाऐसा । म्हणोनि पेरावया धिंवसा[12] । श्रीनिवृत्तीसी ॥ ९१ ॥ ज्ञानदेव म्हणे मी चाडें । सद्गुरूनीं केलें [13]कोडें । माथां हात ठेविला तें फुडें । बीजचि वाइलें ॥ ९२ ॥ म्हणऊनि येणें मुखें जें जें निगे । तें संतांच्या हृदयीं साचेंचि लागे । हें असो सांगों श्रीरंगें । बोलिलें जें ॥ ९३ ॥ परि तें मनाच्या कानीं ऐकावें । बोल बुद्धीच्या डोळां देखावे । हे [14]सांटोवाटीं घ्यावे । चित्ताचिया ॥ ९४ ॥ अवधानाचेनि हातें । नेयावे हृदयाआंतौते । हे रिझवितील[15] आयणीतें[16] । सज्जनाचिये ९५ हे स्वहितातें निववितीं । परिणामातें[17] जीववितीं[18] । सुखाची वाहती । लाखोली जीवां ॥ ९६ ॥ आतां अर्जुनेंसीं श्रीमुकुंदें । [19]नोगर बोलिजेल विनोदें । तें वोवियेचेनि प्रबंधें[20] । सांगेन मी ॥ ४९७ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां

षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

श्लोक ४७, ओंव्या ४९७.

---

१ हर्षानें. २ भरतें आलें. ३ शांतिरस. ४ पेरला जाईल; विस्तारिला जाईल. ५ तांदूळ इत्यादि भरून केलेला पेंढ्याचा गठ्ठा. ६ सिद्धांत. ७ वृष्टि. ८ गुंताडे. ९ परिपक्क झाले. १० चतुरांच्या–शहाण्यांच्या अंतःकरणाचे. ११ पेरण्याजोगी ऊब. १२ धैर्य. १३ नवल. १४ उत्कंठेनें. १५ रमवितील. १६ मनाला. १७ नाशाप्रत. १८ मुक्त करिती. १९ सर्वोत्कृष्ट. २० कवितेनें.



या आनंदाचे भरांत ते पुढील कथा सांगतील. ८८ तो प्रसंग पुढें असून त्यांत शांतिरस स्पष्ट दिसेल, व ज्ञानरूप बीजाचा मुढा उघडा होईल. ८९ जें ज्ञानबीज पेरण्याकरितां सत्त्वगुणाची वृष्टि होऊन, व आध्यात्मिक तापांचे गुंतडे वाहून जाऊन, चतुर श्रोत्यांच्या चित्तांचे वाफे सहज तयार झाले, ४९० त्यावर स्रोन्यासारखी अवधानाची घात साधल्यामुळें श्रीनिवृत्तिनाथांना तें ज्ञानरूप बीज पेरण्याची उत्कंठा उत्पन्न झाली. ९१ ज्ञानदेव म्हणतातः—तें बीज पेरण्याकरितां सद्गुरूनीं माझी मोठ्या कौतुकानं चाड्याच्या ठिकाणीं योजना केली, व माझ्या मस्तकावर हात ठेवून तें बीज चाड्यांत घातलें. ९२ म्हणून, माझ्या मुखांतून जें जें कांहीं निघेल, तें संतांच्या मनाला खरेंच भासतें. हें असो, आतां श्रीरंग जें कांहीं बोलले, तें मी पुढें सांगेन. ९३ परंतु तें लक्ष देऊन ऐका, बुद्धीनें त्याचा विचार करा, त्याला चित्त अर्पण करून त्याचा अर्थ घ्या, ९४ व अवधानरूप हातानें तें आपल्या हृदयांत साठवा. म्हणजे सज्जनांच्या मनाला हें रमविणारें आहे. ९५ त्या बोलापासून नित्य आत्मप्राप्ति होईल, संकटांतून मुक्तता होईल, व जीवाला सुखप्राप्ति होईल. ९६ आतां, श्रीमुकुंद अर्जुनाला विनोदानें जें कांहीं सर्वोत्कृष्ट ज्ञान सांगतील, तें मी ओंवी नामक कवितेनें तुम्हांला सांगेन. ४९७



# ज्ञानेश्वरी.

## अध्याय सातवा.

श्रीभगवानुवाच—

मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः ।
असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु॥१॥
ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।
यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते २

**अन्वय**-पार्थ, मयि आसक्तमनाः मदाश्रयः [त्वं] योगं युञ्जन्, असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तत् शृणु. ॥१॥ अहं ते इदम् सविज्ञानं ज्ञानं अशेषतः वक्ष्यामि; यत् ज्ञात्वा इह भूयः अन्यत् ज्ञातव्यं न अवशिष्यते. ॥२॥

आइका मग तो अनंतु । पार्थातें असे म्हणतु । पैं गा तूं योगयुक्तु । जालासि आतां ॥१॥ मज समग्रातें जाणसी ऐसें । आपुलिया तळहातींचें रत्न जैसें । तुज ज्ञान[1] सांगेन तैसें । विज्ञानेंसीं[2] ॥२॥ एथ विज्ञानें काय करावें । ऐसें घेसी जरी मनोभावें । तरी पैं आधीं जाणावें । तेंचि लागे ॥ ३ ॥ मग ज्ञानाचिये वेळे । झांकती जाणिवेचे[3] डोळे । जैसी तीरीं नाव न ढळे । टेंकलीसांतीं[4] ॥४॥ तैसी जाणीव जेथ न[5] रिघे । विचार मार्गुता[6] पाउलीं निघे । तर्कु आयणी नेघे । आंगीं जयार्थ्या ॥५॥ अर्जुना तया नांव ज्ञान । येर प्रपंच हें विज्ञान । तेथ सत्यबुद्धि तें अज्ञान । हेंही जाण ॥६॥ आतां अज्ञान अवघें हरपे । विज्ञान निःशेष करपे । आणि ज्ञान तें स्वरूपें । होऊनि जाइजे ॥७॥ जेणें सांगतयाचें बोलणें खुंटे । ऐकतयाचें व्यसन तुटे । हें जाणणें सानें मोठें । दरों नेदी ॥८॥ ऐसें वर्म जें गूढ । तें किजेल वाक्यारूढ । जेणें थोडेनि पुरे कोडें । बहुत मनींचें ॥ ९ ॥

मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।
यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ३

**अन्वय**-मनुष्याणां सहस्रेषु कश्चित् सिद्धये यतति; यतताम् सिद्धानाम् अपि कश्चित् मां तत्त्वतः वेत्ति. ॥३॥

पैं गा मनुष्यांचिया सहस्रशां-। माजि विपाइले-चिया[12] येथ धिंवसा[13] । तैसें या धिंवसेकरां बहुवसां । माजि विरळा जौंणे[14] ॥१०॥ जैसा भरलेया त्रिभुवना-। आंतु एकएकु चांगु[15] अर्जुना । निवडूनि कीजे सेना । लक्षवरी ॥११॥ कीं तयाहीपाठीं । जे वेळीं लोहें[16] मांसातें[17] घांटी[18] । ते वेळीं विजयश्रियेच्या पाटीं । एकचि बैसे ॥१२॥ तैसे आस्थेच्या महापुरीं । रिघताती कोटिवरी । परी प्राप्तीच्या[19] पैलतीरीं । विपाइला[20] निगे ॥१३॥ म्हणऊनि सामान्य गा नोहे । हे सांगतां वाडिलें[21] गोठि गा आहे । परी तें बोलों येईल पाहें । आतां प्रस्तुत ऐकें ॥१४॥

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥

**अन्वय**–भूमिः, आपः, अनलः, वायुः, खं, मनः, बुद्धिः एव च अहंकारः इति अष्टधा भिन्ना मे इयं प्रकृतिः [ अस्ति. ] ॥ ४ ॥

तरी अवधारीं गा धनंजया । हे महदादिक[22] माझी माया । जैसी प्रतिबिंबे छाया । निजांगाची ॥१५॥ आणि इयेतें प्रकृति म्हणिजे । जे अष्टधा[23] भिन्न जाणिजे । लोकत्रय निपजे[24] । इयेस्तव ॥ १६ ॥ हे अष्टधा भिन्न कैसी । ऐसा ध्वनि[25] धरिसी जरी मानसीं । तरी तेचि गा आतां परियेसीं । विवं-

१ ब्रह्मज्ञान. २ व्यावहारिक ज्ञानासह. ३ बुद्धीचे. ४ असता. ५ शिरत नाहीं. ६ मागल्या. ७ हुरूप. ८ ज्याच्या (ब्रह्माच्या.) ९ छंद. १० लहान. ११ आवड; हौस. १२ एखादाच. १३ इच्छा. १४ जाणतो. १५ चांगला शूर. १६ शस्त्र. १७ शरिरावर. १८ घाव करितें. १९ आत्मप्राप्तीच्या. २० कचित्. २१ कठीण. २२ महत्तत्त्वादि. २३ आठ प्रकारांनीं. २४ उत्पन्न होतें. २५ शंका.

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय सातवा.

**भगवान म्हणाले:—अर्जुना, माझ्या ठिकाणीं मन आसक्त करून व केवळ माझाच आश्रय धरून तूं योगाभ्यास करूं लागलास, म्हणजे ज्या प्रकारें निःसंशय मला समग्र (पूर्णपणें) जाणशील, तो प्रकार ऐक. ॥ १ ॥ मी तुला विज्ञानासहवर्तमान तें ज्ञान पूर्णपणें सांगतों. तें जाणल्यावर मग या लोकीं आणखी जाणण्याजोगें कांहीं राहणार नाहीं. ॥२॥**

श्रोतेहो, ऐका. मग श्रीअनंत पार्थाला म्हणाले:—अरे, तूं निश्चयेंकरून योगयुक्त झालास. १ आतां मी तुला व्यावहारिक (प्रापंचिक) ज्ञानासह ब्रह्मज्ञान अशा रीतीनें सांगेन कीं, त्या योगानें, तळहातावरील रत्न आपण पहातों, त्याप्रमाणें तूं मला सगळा ओळखशील. २ या ठिकाणीं प्रापंचिक ज्ञानाशीं काय करावयाचें आहे? असा जर तुझ्या मनाचा ग्रह होईल, तर आधीं खरोखर तेंच समजून घेतलें पाहिजे. ३ मग ज्ञानाच्या साक्षात्काराच्या वेळीं बुद्धीची नजर थांबते: ज्याप्रमाणें तीराला टेंकलेली नाव हालत नाहीं, ४ त्याप्रमाणें, ज्या ठिकाणीं बुद्धीचा शिरकाव होत नाहीं, विचारही मागें राहतो, आणि तर्काचा हुरूप मोडतो, ५ त्यालाच ज्ञान असें म्हणतात; अर्जुना, बाकीचीं सर्व प्रापंचिक ज्ञानें, त्यांना विज्ञान असें म्हणतात; आणि प्रपंच खरा मानणें हें अज्ञान होय असें समज. ६ आतां, सर्व अज्ञान नाहींसें होईल, विज्ञान समूळ जळून जाईल, आणि मूर्तिमंत ज्ञान प्रकट होईल; ७ ज्याच्या योगानें सांगणाराचें बोलणें खुंटतें, ऐकणाराची इच्छा कमी होते, आणि अमुक मोठें व अमुक लहान असा भेद रहात नाहीं; ८ व जें थोडें ऐकलें असतां सुद्धां मनांतील पुष्कळ हेतु पूर्ण होतील, तें गुप्त तत्त्व मी तुला सांगतों. ९

**हजारों मनुष्यांमध्यें कोणी एखादाच माझ्या प्राप्तीविषयीं यत्न करितो; आणि माझ्याकरितां यत्न करणाऱ्या सिद्धांतूनही एखादाच मला तत्त्वतः (खऱ्या खऱ्या स्वरूपानें) जाणतो. ॥३॥**

अरे, खरोखर हजारों मनुष्यांत एखाद्यालाच या ज्ञानाची इच्छा होते, आणि तशाच ज्ञानाची इच्छा उत्पन्न झालेल्या पुष्कळांत मला जाणणारा क्वचितच सांपडतो. १० ज्याप्रमाणें मनुष्यांनीं भरलेल्या त्रिभुवनांत फौजेमध्यें ठेवण्याकरितां एकेक चांगला शूर निवडून लक्षावधि फौज तयार करितात, ११ आणि त्यांतूनही, ज्या वेळेस तरवारीचे घाव शरिरावर बसतात त्या वेळेस एखादाच विजयश्रीचा अधिकारी होतो, १२ त्याप्रमाणें, माझ्या ज्ञानाच्या प्राप्तीच्या आस्थेच्या पुरांत कोट्यवधि लोक उड्या टाकतात; परंतु एखादाच तिच्या पैलथडीस जातो. (एखाद्यालाच माझी प्राप्ति होते) १३ म्हणून, ही सामान्य गोष्ट नसून मोठी श्रेष्ठ आहे; परंतु ती पुढें सांगतां येईल. प्रस्तुत [तुला विज्ञानाचें रूप सांगतों तें] ऐक. १४

**भूमि, उदक, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि आणि अहंकार अशी आठ प्रकारें विभागलेला माझी प्रकृति आहे. ॥४॥**

हे धनंजया, ऐक. आपल्या अंगाची पडछाया असते, त्याप्रमाणें हीं महदादि तत्त्वें म्हणजे माझी माया होय; १५ हिलाच प्रकृति असें म्हणावें; व हिचे आठ निरनिराळे प्रकार आहेत असें समजावें; आणि हिच्यापासून हें त्रैलोक्य उत्पन्न होतें. १६ ही आठ प्रकारांनीं कशी निराळी आहे अशी शंका जर तूं मनांत आणशील,

---

१ श्रीशंकराचार्य—सविज्ञानं = स्वानुभवसंयुक्तम्
(विज्ञानासह=अनुभवयुक्त ज्ञानासह.)
श्रीज्ञानेश्वर—येर प्रपंच हें विज्ञान (प्रापंचिक ज्ञानाला विज्ञान म्हणतात.)

चर्नां[1]॥ १७ ॥ आप[2] तेज गगन । मही[3] मारुत[4] मन । बुद्धि अहंकार हे भिन्न । आठै भाग ॥१८॥

**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥५॥**

**अन्वय**–महाबाहो, इयम् अपरा; इतः तु अन्यां जीवभूतां मे पराम् प्रकृतिं विद्धि; यया इदं जगत् धार्यते. ॥ ५ ॥

या आठांची जे साम्यावस्थां । ते माझी परम प्रकृति पार्था । तिये नाम व्यवस्था । जीव ऐसी ॥१९॥ जे जडातें जीववी । चेतनेतें चेतवी । मनाकरवीं मानवी । शोक मोहो ॥ २० ॥ पैं बुद्धीच्या अंगीं जाणणें । तें जिये जवळिकेचें करणें । जिया अहंकाराचे विंदाणें । जगचि धरिजे ॥ २१ ॥

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।**
**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥६॥**

**अन्वय**–सर्वाणि भूतानि एतद्योनीनि इति उपधारय; अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः तथा प्रलयः. ॥ ६ ॥

ते सूक्ष्म प्रकृति[11] कोडें । जैं स्थूळाचिया[12] आंगा घडे । तैं भूतसृष्टीची[13] पडे । टांकसाळ ॥ २२ ॥ चतुर्विध[14] ठसा । उमटों लागे आपैसा । मोलें[15] तरी सरिसा । परि थरचि[16] आनान ॥ २३ ॥ होती चौऱ्यांशीं लक्ष थरा । येरा मिती नेणिजे भांडारां[17] । भरे आदिशून्याचा[18] गाभारा । नाणेयांसीं ॥ २४ ॥ ऐसे एकतुकें[19] पांचभौतिक । पडती बहुवस टांकें[20] । मग तिये समृद्धीचे लेखें[21] । प्रकृतीचि धरी ॥२५॥ जे आंखूनि[22] नाणें विस्तारी । पाठीं तयाची आटणी करी । माजी कर्माकर्मांचिया व्यवहारीं । प्रवर्तु[23] दावी ॥२६॥ हें रूपकें[24] परी असो । सांगों उघड जैसें परियेसों । तरी नामरूपाचा[25] अंतिसो । प्रकृतीच कीजे ॥२७॥ आणि प्रकृति तंव माझ्या ठायीं विंबे[26] येथ आन नाहीं । म्हणोनि आदि मध्य अवसानें[27] पाहीं । जगासि मी ॥ २८ ॥

**मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।**
**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥७॥**

**अन्वय**–धनंजय, मत्तः परतरं अन्यत् किंचित् न अस्ति; सूत्रे मणिगणाः इव इदं सर्वं मयि प्रोतं. ॥ ७ ॥

हें रोहिणीचें[28] जळ । तयाचें पाहातां येइजे मूळ । तैं रश्मि[29] नव्हती केवळ । होय तें भानु ॥ २९ ॥ तयाचिपरी किरीटी । ह्या प्रकृती जालिये सृष्टी । जैं उपसंहरूनि कीजेल ठी । तैं मीचि आहें ॥३०॥ ऐसें होये[30] दिसे न दिसे । हें मजचिमाजीं असे । मियां विश्व धरिजे जैसें । सूत्रें[31] मणि ॥३१॥ सुवर्णाचे मणी केले । ते सोनियाचे सुतीं वोविले । तैसें म्यां जग धरिलें । सबाह्याभ्यंतरीं[32] ॥ ३२ ॥

**रसोऽहमप्सु कौंतेय प्रभाऽस्मि शशिसूर्ययोः ।**
**प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥**
**पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।**
**जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥**

**अन्वय**—कौंतेय, अहं अप्सु रसः, शशिसूर्ययोः प्रभा अस्मि; सर्ववेदेषु प्रणवः, खे शब्दः, नृषु पौरुषम् [अस्मि.] ॥८॥ च [ अहं ] पृथिव्यां पुण्यः गंधः, च विभावसौ तेजः अस्मि; सर्वभूतेषु जीवनं, च तपस्विषु तपः अस्मि. ॥९॥

म्हणोनि उदकीं रसु[33] । कां पवनीं[34] जो स्पर्शु । शशिसूर्यी जो प्रकाशु । तो मीचि जाण ॥३३॥ तैसाचि नैसर्गिकु[35] शुद्धु । मी पृथ्वीच्या ठायीं गंधु । गगनीं मी शब्दु । वेदीं प्रणवु[36] ॥३४॥ नराच्या ठायीं नरत्व[37] । जें अहंभावियें[38] सत्त्व[39] । तें पौरुष[40] मी हें तत्त्व । बोलिजत असे ॥३५॥ अग्नि ऐसें आहाचि[41] । तेजीं[42] नामाचें आहे कवच । तें परतें केलिया साच । निजतेज

१ विचार. २ पाणी. ३ पृथ्वी. ४ वायु. ५ एकीकरण. ६ चेतन. ७ अचेतनाला. ८ ज्ञानाला. ९ सान्निधपणानें. १० कुशलतेनें. ११ आवडीनें. १२ महाभूतांच्या. १३ प्राण्यांच्या उत्पत्तीची. १४ जारज=मनुष्य; अंडज=पक्षी; स्वेदज=उवा, लिखा वगैरे; आणि उद्भिज्ज=लतावृक्षादि या चोहोंची. १५ योग्यतेनें. १६ जाति; भाग. १७ भरती. १८ निराकाराचा. १९ एकसारखे. २० नाणीं; ठसे. २१ जमाखर्च. २२ खुणा करून. २३ प्रवृत्ति. २४ सादृश्याचें उदाहरण. २५ विस्तार. २६ भासते. २७ लय. २८ मृगजळ. २९ किरण. ३० उत्पन्न होतें. ३१ दोऱ्यानें. ३२ अंतर्बाह्य. ३३ गोडी. ३४ वाऱ्यांत. ३५ स्वाभाविक. ३६ ॐकार. ३७ मनुष्यपणा. ३८ मीपणा. ३९ बळ. ४० पराक्रम. ४१ उगीच. ४२ प्रकाशांत.

तर तोच विचार सांगतों, ऐक. १७ उदक, तेज, आकाश, पृथ्वी, वायु, मन, बुद्धि आणि अहंकार हे तिचे निरनिराळे आठ प्रकार आहेत. १८

**हे महाबाहो, ही अपरा म्हणजे गौण प्रकृति होय. इच्याहून वेगळी जी माझी परा म्हणजे जीवभूता प्रकृति, ती श्रेष्ठ आहे असें समज. तिचा या जगताला आधार आहे. ॥५॥**

पार्था, त्या आठ भागांची साम्यस्थिति (एकीकरण) ती माझी परमप्रकृति, आणि तिलाच जीवभूता ही संज्ञा आहे. १९ ही अचेतनाचें (शरिराचें) जविन करते, ज्ञानाला चेतना देते, आणि मनाला शोक व मोह मानण्यास लाविते. २० हें पहा–हिच्या सान्निध्यानें बुद्धीच्या अंगीं ज्ञान उत्पन्न होतें, व ही अहंकाराच्या कुशलतेनें जगाला धारण करिते. २१

**या दोन्ही प्रकृति सर्व भूतांच्या उत्पत्तीला कारण आहेत असें तूं समज; [आणि म्हणून] मी सर्व जगताचा उत्पत्तिकर्ता आणि संहारकर्ता आहें. ॥ ६ ॥**

ही सूक्ष्म (परा) प्रकृति जेव्हां स्वेच्छेनें स्थूल प्रकृतीशीं संयुक्त होते, तेव्हां सृष्टींतील प्राण्यांची टांकसाळ सुरू होते. २२ त्या टांकसाळींत आपोआप चार प्रकारचे ठसे उमटूं लागतात. त्यांतील पंचमहाभूतांची योग्यता सारखीच असते, परंतु जाति भिन्न असतात २३ त्यांच्या चौऱ्यायशीं लक्ष जाति असून, त्या जातींत आणखी किती जाति आहेत त्यांची गणती नाहीं. अशा पुष्कळ नाण्यांनीं (जातींनीं) निराकार शून्य म्हणजे अव्यक्ताचा गाभारा भरून जातो. २४ याप्रमाणें पंचमहाभूतांचे एकसारखे पुष्कळ ठसे बनतात, व त्यांच्या वृद्धीची गणना प्रकृति (माया) हीच ठेवते. २५ ती नाण्यांवर खुणा करून त्यांचा विस्तार करिते, व मागाहून त्यांची आटणी करिते; अशा प्रकारें कर्माकर्मांप्रमाणें घडामोड करण्याची मायेची प्रवृत्ति आहे. २६ हें रूपक असो; तुला समजेल अशा उघड रीतीनें सांगावयाचें म्हटलें, तर ही प्रकृतिच प्राण्यांच्या नामरूपांचा विस्तार करते; २७ आणि प्रकृति तर निःसंशय माझ्याच ठायीं बिंबते; अर्थात् जगाची उत्पत्ति, स्थिति व लय यांस मीच कारण आहें. २८

**हे धनंजया, माझ्याहून जगाला दुसरें कारण कांहीं नाहीं. [सोन्याचे] सुतांत जसे सोन्याचे मणि ओवावे, तसें हें सर्व जग ओतप्रोत माझ्यांत ओंविलेलें आहे. ॥ ७ ॥**

[हें दृश्य विश्व मृगजळासारखें आहे!] मृगजळाचें मूळ पाहूं गेलें असतां तें केवळ सूर्यकिरण नसून सूर्यच होय; २९ त्याचप्रमाणें, अर्जुना, जीपासून ही सृष्टि झाली आहे, ती प्रकृति आणि सृष्टि यांचा उपसंहार करून (यांना वजा करून) पाहिलें तर अवशिष्ट तत्त्व मीच आहें. ३० अशा प्रकारें, जें उत्पन्न होतें, दिसतें व नाहींसें होतें, तें माझ्याच ठिकाणीं होतें. ज्याप्रमाणें दोऱ्यानें मणि धरलेले असतात, त्याप्रमाणें मीं हें विश्व धरलें आहें. ३१ सोन्याचे मणि करून ते सोन्याच्याच तारेंत ओंवावे, त्याप्रमाणें हें सर्व जग अंतर्बाह्य मींच व्यापलें आहे. ३२

**हे कौंतेया, सर्व उदकामध्यें जो रस तो मी आहें; सूर्यचंद्रांमध्यें जी प्रभा, ती मी; सर्व वेदांमध्यें जो प्रणव (ॐकार) तो मी; आकाशामध्यें शब्द तो मी; पुरुषांमध्यें पराक्रम तो मी आहें; ॥८॥ आणि पृथ्वीमध्यें उत्तम सुवास तो मी; अग्नीमध्यें तेज मी; सर्व भूतांच्या ठायीं जीवन मी; व तपस्व्यांमध्यें तप मी आहें. ॥ ९ ॥**

म्हणून, पाण्यांत जो रस आहे, किंवा वाऱ्यांत जो स्पर्श आहे, आणि चंद्र व सूर्य यांच्यांत जो प्रकाश आहे, तो मीच आहें असें समज. ३३ त्याचप्रमाणें, पृथ्वीच्या ठिकाणीं स्वभावतः असणारा जो सुवास, तो मी; आकाशांत शब्द म्हणून जो आहे, तो मी; तसेंच वेदांत ॐकार म्हणून जो आहे, तो मी. ३४ मनुष्याच्या ठिकाणीं असणारा मनुष्यपणा–जो अहंभावाचें सत्त्व आहे–तें पौरुष मी, हें तत्त्व तुला सांगून ठेवतों. ३५ तेजाला अग्नि या नांवाचें जें उगीच पांघरूण आहे, तें दूर केलें असतां त्याचें खरें स्वरूप

तें मी ॥ ३६ ॥ आणि नानाविध योनी । जन्मोनि[1] भूतें त्रिभुवनीं । वर्तत आहाति जीवनीं । आपुलाल्या ॥ ३७ ॥ एकें पवनेंचि[2] पिती । एकें तृणास्तव[3] जिती । एकें अन्नाधारें राहाती । जळें एकें ॥ ३८ ॥ ऐसें[4] भूतप्रति आनान[5] । जें प्रकृतिवशें दिसे जीवन[6] । तें आघवांठायीं[7] अभिन्न । मीचि एक ॥ ३९ ॥

**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।**
**बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥१०॥**
**बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम् ।**
**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥११॥**

**अन्वय**—पार्थ, मां सर्वभूतानां सनातनं बीजं विद्धि; [ अहं ] बुद्धिमतां बुद्धिः अस्मि; अहं तेजस्विनां तेजः [ अस्मि; ] ॥१०॥ च अहं बलवतां कामरागविवर्जितं बलं [अस्मि; हे] भरतर्षभ, भूतेषु धर्माविरुद्धः कामः अहं अस्मि"

पैं आदिचेनि[8] अवसरें । विरूढे[9] गगनाचेनि अंकुरें । जें[10] अंतीं गिळी अक्षरें[11] । प्रणवपीठींचीं[12] ॥४०॥ जंव हा विश्वाकार असे । तंव जें विश्वाचिसारिखें दिसे । मग महाप्रळयदशे । कांहींच नव्हे[13] ॥ ४१ ॥ ऐसें अनादि जें सहजें[14] । तें मी गा विश्वबीज[15] । हें हातातळीं तुज । देइजत असें ॥ ४२ ॥ मग उघड करूनि पांडवा । जें हें आणिसी सांख्याचिया[16] गांवा । तैं ययाचा उपेगु[17] बरवा । देखशील ॥४३॥ परी हे अप्रासंगिक आलोप[18] । आतां असतु[19] बोलों संक्षेप । जाण तपियांच्या ठायीं तप । तें रूप माझें ॥४४॥ बळियामाजि बळ । तें मी जाण अढळ । बुद्धिमंतीं केवळ । बुद्धि ते मी ॥४५॥ भूतांच्या ठायीं कामु । तो मी म्हणे आत्मारामु[20] । जेणें अर्थास्तव धर्मु । थोरु होय ॥४६॥ येऱ्हवीं विकाराचेनि[21] पैसें । करी कीर इंद्रियांचि ऐसें । परी धर्मासि वेखासें[22] । जावों नेदी ॥४७॥ [23]जो अप्रवृत्तीचा[24] अव्हांटा[25] । सांडूनि विधीचिया निघे वाटा । तेवींचि नियमाचा दिवटा[26] । सवें चाले ॥४८॥ कामु ऐशिया वोजा[27] प्रवर्ते । म्हणोनि धर्मासि होय पुरतें । मोक्षतीर्थींचे मुक्तें[28] । संसार भोगी ॥४९॥ जो श्रुतिगौरवाच्या[29][30] मांडवीं । काम सृष्टीचा वेलु वाढवी । जंव कर्मफळेंसि पालवी । अपवर्गीं टेंके ॥५०॥ ऐसा नियंतु[31] कां कंदर्पु[32] । जो भूतां यां बीजरूपु । तो मी म्हणे बापु । योगियांचा ॥५१॥ हें एकेक किती सांगावें । आतां वस्तुजातचि आघवें । मजपासूनि जाणावें । विकारलें[33] असे ॥५२॥

**ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।**
**मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥१२॥**

**अन्वय**––ये सात्त्विकाः भावाः च एव राजसाः च ये तामसाः [ भावाः संति, ते ] मत्तः एव इति तान् विद्धि; अहं तु तेषु न [ अस्मि ], ते मयि [ वर्तंते. ] ॥ १२ ॥

जे सात्त्विक हन भाव[34] । कां रजतमादि सर्व । ते ममरूपसंभव[35] । वोळखें तूं ॥५३॥ ते हे जाले तरी माझ्या ठायीं । परी तयांमाजीं मी नाहीं । जैसी स्वप्नींच्या डोहीं । जागृति न बुडे ॥५४॥ जैसी रसाचीच घुंघट[36] । बीजकणिका[37] घनवट[38] । परी तियेस्तवें[39] होय काष्ठ । अंकुरद्वारें ॥५५॥ मग तया काष्ठाच्या ठायीं । सांग पां बीजपण असे काई । तैसा मी विकारी नाहीं । जरी विकारला दिसें ॥५६॥ पैं गगनीं उपजे आभाळ । परी तेथ गगन नाहीं केवळ । अथवा आभाळीं होय सलिल[40] । तेथ अभ्र नाहीं ॥५७॥ मग त्या उदकाचेनि आवेशें । प्रगटलें तेज जें लखलखीत दिसे । तिये विजूमाजीं असे । सलिल कायी ॥५८॥ सांगें अग्नीस्तव धूम होये । तिये धूमीं काय अग्नि आहे । तैसा विकारु[41] हा मी नोहें । जरी विकारला असें ॥५९॥

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।**
**मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥१३॥**

१ उपजीविकेंत; ( अन्नानें. ) २ वारा. ३ गवतावर ४ प्रत्येक प्राण्याला. ५ निरनिराळें. ६ अन्न. ७ सर्व ठिकाणीं. ८ उत्पत्तीच्या वेळेस. ९ विस्तार पावतें. १० जें बीज ११ अ, उ, म् हीं १२ ॐकाराचीं अक्षरें. १३ कोणासारखे नाहीं. १४ स्वतःसिद्ध १५ जगाचें कारण. १६ विचाराच्या. १७ उपयोग. १८ बोलणें. १९ बाजूला राहूं दे. २० श्रीकृष्ण. २१ पसारा. २२ विरुद्ध. २३ जो काम. २४ निषेधाची. २५ आडवाट. २६ मशाल. २७ रीतीनें. २८ मुक्तता. २९ श्रुतींच्या महत्त्वाच्या. ३० मोक्षांत. ३१ नियमानें वागणारा. ३२ काम. ३३ विस्तार पावलें. ३४ विकार. ३५ माझ्या रूपापासून उत्पन्न झालेले. ३६ चांगली घडलेली. ३७ दाणा; बीं. ३८ घट्ट. ३९ तिच्यापासून. ४० पाणी. ४१ स्वभाव.

तें मी; ३६ आणि या त्रिभुवनांत प्राणी पुष्कळ प्रकारच्या जातींत जन्म घेऊन आपआपल्या जातीच्या अनुरोधानें अन्नादि जीवनानें जीवन पावतात: ३७ कोणी वारा पिऊन असतात, कोणी गवतावर उपजीविका करतात, कोणी अन्नावर राहतात, आणि कोणी पाण्यावर आपलें उपजीवन करतात; ३८ असें प्रत्येक प्राण्याचें त्याच्या प्रकृतीच्या मानानें जें निरनिराळें जीवन दिसतें, तें सर्व मीच आहें. ३९

**पार्था, सर्व भूतांचें सनातन बीज मी हें जाण. बुद्धिमंताची बुद्धि मी; तेजस्व्यांचें तेज मी. ॥१०॥ इच्छा-प्रीति-रहित असें बलवान पुरुषाचें बल मी; हे भरतश्रेष्ठा, सर्व भूतांचे ठिकाणीं धर्माला अनुकूल असणारा जो काम ( अन्नपानादिविषयक इच्छा ) तो मी आहें. ॥ ११ ॥**

खरोखर, उत्पत्तीचे वेळीं जें आकाशाच्या अंकुरानें विस्तार पावतें आणि जें अंतकालीं ॐकाराचीं अक्षरें गिळून टाकतें; ४० जोंपर्यंत या जगाला आकार आहे, तोंपर्यंत जें त्याच्यासारखेंच दिसतें, परंतु महाप्रलयाचे वेळेस नें कोणत्याही आकाराचें नसतें; ४१ असें जें ह्या जगाचें अनादि व स्वतःसिद्ध बीज, तें मी आहें; तें आज अगदीं तुझ्या हातांत देत आहें. ४२ मग, अर्जुना, तें समजून घेऊन जर तूं त्याचा विचार करशील, तर त्याचा उपयोग कसा चांगला होईल तो पहाशील. ४३ परंतु आतां हें अप्रासंगिक बोलणें बाजूला राहूं दे; तुला मी आपला संक्षेपानें सांगतों: हें पहा—तपस्व्यांचे ठायीं तप म्हणून जें आहे, तें माझें रूप होय. ४४ बलवानांत बळ म्हणून जें आहे तें मी असें निःसंशय समज; आणि बुद्धिमंतांत बुद्धि म्हणून जी आहे ती मी. ४५ श्रीकृष्ण म्हणतात:—ज्याच्या आचरणापासून धर्म व अर्थ हे पुरुषार्थ साध्य होतात, तो प्राणिमात्राचे ठिकाणीं असणारा काम मी. ४६ येरवीं, विकार उत्पन्न होऊन इंद्रियांच्या इच्छेप्रमाणें जरी आचरण केलें, तरी तो काम धर्माविरुद्ध जाऊं देत नाहीं. ४७ तो काम निषेधाची आडवाट सोडून विधीच्या वाटेनें नीट जातो; आणि त्याचप्रमाणें त्याच्या बरोबर नियमरूप मशाल पेटलेली असते. ४८ अशा रीतीनें हा चालतो, म्हणून धर्माचें आचरण पूर्ण होतें; व त्यामुळें संसारांत राहणाराला मोक्षरूपी तीर्थांत मुक्ति प्राप्त होते. ४९ तो काम वेदाच्या महत्त्वरूपी मांडवावर कर्मफलांचीं पानें मोक्षाला लागत तोंपर्यंत सृष्टीचा वेल वाढवितो. ५० योग्यांचे जनक श्रीकृष्ण म्हणतात:—अशा नियमानें राहणारा व प्राणिमात्रास बीजभूत असा काम, तो मी आहें. ५१ हें एकेक तुला कोठवर सांगावें! तर वस्तुमात्र म्हणून जें कांहीं आहे, तें सर्व माझ्यापासून विस्तार पावलें आहे असें समज. ५२

**जे सात्त्विक, राजस आणि तामस विकार आहेत, ते माझ्यापासूनच उत्पन्न झाले आहेत, असें तूं समज. पण ह्यांच्या ठायीं मी नाहीं, माझ्या ठायीं ते आहेत. ॥ १२॥**

जे सात्त्विक किंवा रजतमादि भाव आहेत, ते सर्व माझ्या रूपापासूनच उत्पन्न झाले आहेत हें ओळखून ठेव. ५३ ते जरी माझ्यापासून झाले आहेत, तरी मी त्यांच्यांत नाहीं. ज्याप्रमाणें स्वप्नाच्या डोहांत जागृति बुडत नाहीं; ५४ [ किंवा ] ज्याप्रमाणें बीं ( दाणा ) रसानें पूर्ण भरलेलें असतें; परंतु त्याचेपासून अंकुर फुटून लांकूड बनल्यावर ५५ मग त्या लांकडाचे ठिकाणीं बीज असतें का सांग बरें? त्याचप्रमाणें, सात्त्विकादि सर्व भाव जरी माझ्यापासून उत्पन्न झाले आहेत, तरी त्यांमध्यें मी नाहीं. ५६ खरोखर, आकाशांत जे ढग उत्पन्न होतात, त्यांत शुद्ध आकाश नसतें; किंवा ढगांत जें पाणी असतें, त्या पाण्यांत ढग नसतात; ५७ नंतर त्या पाण्याच्या घर्षणानें उत्पन्न होणारें तेज ( वीज ) जें चकचकीत दिसतें, त्या विजेमध्यें पाणी असतें काय? ५८ अग्नीपासून जो धूर उत्पन्न होतो, त्या धुरांत अग्नि आहे का सांग बरें? त्याचप्रमाणें, हे भाव जरी माझ्यापासून उत्पन्न झाले आहेत, तरी ते म्हणजे मी नव्हे. ५९

**या त्रिगुणमय विकारांनीं हें सर्व जग मोहून गेलें आहे; म्हणून, या गुणांच्या पलीकडे असलेला अविनाशी असा जो मी, त्या मला तें जाणत नाहीं. ॥ १३ ॥**

**अन्वय**——एभिः त्रिभिः गुणमयैः भावैः इदं सर्वं जगत् मोहितं; [ यतः ] एभ्यः परं अव्ययं मां न अभिजानाति. ॥ १३ ॥

परी उदकीं जाली बाबुळी[१] । ते उदकातें जैसी झांकोळी[२] । कां वायांचि आभाळीं । आकाश लोपे ॥६०॥ हां गा स्वप्न लटिकें म्हणों ये । परि निद्रावशें बाणलें[३] होये । तंव आठवु काय देत आहे । आपणपेयां ॥ ६१ ॥ हें असो डोळ्यांचें । डोळांचि पडळ[४] रचे । तेणें देखणेपण डोळ्यांचें । न गिळिजे कायि ॥ ६२ ॥ तैसी हे माझीच बिंबली[५] । त्रिगुणात्मक साउली । कीं मजचि आड वोडवली[६] । जवनिका[७] जैसी ॥ ६३ ॥ म्हणऊनि भूतें मातें नेणती । माझींच परी मी[८] नव्हती । जैसीं जळींचीं जळीं न विरती । मुक्ताफळें[९] ॥६४॥ पैं पृथ्वीयेचा घटु कीजे । सवेंचि पृथ्वीसि मिळे तरी मेळविजे । येऱ्हवीं तोचि अग्निसंगें सिजे । तरी वेगळा होय ॥ ६५ ॥ तैसें भूतजात सर्व । हे माझेचि कीर अवयव । परि मायायोगें जीव- । दशे आले ॥ ६६ ॥ म्हणोनि माझेचि मी नव्हती । माझेचि मज नोळखती । अहंममता[१०]भ्रांती । विषयांध झाले ॥ ६७ ॥

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥ १४ ॥**

**अन्वय**——एषा दैवी गुणमयी मम माया हि दुरत्यया [ अस्ति ]; ये मां एव प्रपद्यंते, ते एतां मायां तरंति. १४

आतां महदादि हे माझी माया । उतरोनियां धनंजया । मी होइजे हें ओया[११] । कैसेनि ये ॥ ६८ ॥ जिये ब्रह्माचळाचा[१२] ओधाडा[१३] । पहिलिया संकल्पजळाचा उभेंडा[१४] । सवेंचि महाभूतांचा बुडबुडा । सानों आला ॥ ६९ ॥ जे सृष्टिविस्ताराचेनि[१५] बोधें । चढत काळकळनेचेनि[१६] वेगें । प्रवृत्तिनिवृत्तीचीं[१७] तुंगें[१८] । तटें[१९] सांडी ॥ ७० ॥ जे गुणघनांचेनि[२०] वृष्टिभरें । भरली मोहाचेनि महापूरें । घेऊनि जात नगरें । यमनियमांचीं ॥७१॥ जे द्वेषाच्या आंवर्तीं[२१] दाटत । मत्सराचे वळसे[२२] पडत । माजि प्रमादादि[२३] तळपत[२४] महामीन[२५] ॥७२॥ जेथ प्रपंचाचीं वळणें[२६] । कर्माकर्मांचीं वोभाणें[२७] । वरी तरताती[२८] वोसाणें[२९] । सुखदुःखांचीं ॥७३॥ रतीचियां[३०] बेटा । आदळती कामाचिया लाटा । जेथ जीवफेन[३१] संघटा[३२] । सैंघ[३३] दिसे ॥७४॥ अहंकाराचिया चळिया[३४] । वरि मदत्रयाचिया[३५] उकळिया । जेथ विषयोर्मींच्या[३६] आंकळिया[३७] । उह्याळे[३८] घेती ॥७५॥ उदयास्तांचे[३९] लोंढे । पाडीत जन्ममरणांचे चोंढे[४०] । जेथ पांचभौतिक[४१] बुडबुडे । होती जाती ॥ ७६ ॥ संम्मोह[४२] विभ्रम[४३] मासे । गिळिताति धैर्याचीं आमिषें[४४] । तेथ देव्हडे[४५] भोंवत वळसे[४६] । अज्ञानाचे ॥७७॥ भ्रांतीचेनि खडुळें[४७] । रेवलें[४८] आस्थेचेनि गाळें । रजोगुणाचेनि खळाळें[४९] । स्वर्ग गाजे ॥ ७८ ॥ तमाचे धोरसे[५०] वोड[५१] । सत्त्वाचें स्थिरपण जाड । किंबहुना हे दुवाड[५२] । मायानदी ॥ ७९ ॥ पैं पुनरावृत्तीचेनि उभेंडें[५३] । झळंबती[५४] सत्यलोकींचे हुडे[५५] । धांयें[५६] गडबडती धोंडे । ब्रह्मगोळकाचे[५७] ॥ ८० ॥ तया पाणियाचेनि वहिलेपणें[५८] । अझुनी न धरती वोभाणें[५९] । ऐसा मायापूर हा कवणें । तरिजेल गा ॥ ८१ ॥ येथ एक नवलावो । जो जो कीजे तरणोपावो । तो तो अपावो[६०] । होय तें ऐक ॥८२॥ एक स्वयंबुद्धीच्या बाहीं[६१] । रिगाले तयांची

१ गोंडाळ. २ आच्छादिते. ३ अनुभवास येतें; सत्य भासतें. ४ बडस. ५ प्रतिबिंबित झाली. ६ प्राप्त झाली. ७ पडदा. ८ मद्रूप ९ मोत्यें. १० 'मी' व 'माझें' या भ्रांतीनें. ११ अनुभवास. १२ निर्गुणब्रह्मरूपी पर्वताचा. १३ अर्धा कडा. १४ लोंढा. १५ जीवोत्पत्तीच्या विस्ताराच्या ओघानें. १६ कालगतीच्या. १७ कर्ममार्ग व मोक्षमार्ग यांची. १८ उंच. १९ डगरी. २० सत्त्वादिगुणरूपी मेघांच्या २१ भोंवऱ्यांत. २२ वळणें. २३ उन्मत्तपणा वगैरे. २४ चमकतात. २५ मोठाले मासे. २६ धरणें. २७ पूर. २८ तरंगतात. २९ पुरांत वाहून आलेला कचरा कडेला लागतो तो. ३० विषयसुखाच्या. ३१ जीवरूपी फेंस. ३२ समुदाय. ३३ पुष्कळ. ३४ ओघ. ३५ विद्या, धन व सामर्थ्य हे जे तीन मद, त्यांच्या. ३६ विषयरूपी तरंगांच्या. ३७ लाटा. ३८ उसळतात. ३९ पूर. ४० धोंडे. ४१ शरीर. ४२ अत्यंत मोह. ४३ भ्रांति. ४४ मांसानें. ४५ मोठे. ४६ भोंवरे. ४७ गढूळ पाण्यानें. ४८ रुतलें. ४९ खळखळाटानें. ५० प्रवाह. ५१ मोठा. ५२ कठीण. ५३ लोंढ्यानें. ५४ वाहून जातात. ५५ किडे. ५६ घाईनें. ५७ ब्रह्मांडगोळाचे. ५८ प्रवाहानें. ५९ उभे राहणें. ६० हानि. ६१ बळानें.

तथापि, पाण्यापासूनच उत्पन्न झालेलें गोंडाळ पाण्याला झांकून टाकतें, किंवा ढगाच्या योगानें आकाश व्यर्थ लोपलें जातें; ६० असें पहा कीं, स्वप्न हें खोटें आहे, परंतु निद्रेच्या योगानें तें खरें भासतें, त्या वेळेस तें आपली आपल्याला आठवण होऊं देतें का? ६१ अथवा डोळ्यांतील पाण्यानें उत्पन्न झालेला वडस दृष्टि बंद करीत नाहीं का? ६२ त्याचप्रमाणें, माझ्याच ठिकाणीं प्रतिबिंबित झालेली सत्त्व, रज व तम या गुणांनीं युक्त अशी माझी सावली (माया) पडद्या प्रमाणें माझ्याच स्वरूपाच्या आड येते. ६३ म्हणून प्राणी मला जाणत नाहींत, आणि माझ्याचपासून उत्पन्न झालेले असून मद्रूप होत नाहींत. ज्याप्रमाणें पाण्यापासूनच उत्पन्न झालेलीं मोत्यें पाण्यांत मिसळत नाहींत, ६४ अथवा मातीचा घट करून तो कच्चेपणीं मातींत मिळविला असतां मिळतो—परंतु तोच विस्तवांत भाजल्यावर मिळत नाहीं, ६५ त्याचप्रमाणें, सर्व प्राणी हे माझेच अवयव आहेत; परंतु मायेच्या योगानें जीवपणाला पावले, ६६ म्हणून माझ्यापासून उत्पन्न झाले असून मद्रूप होत नाहींत, माझेच असून मला ओळखीत नाहींत, व 'मी' आणि 'माझें' या भ्रांतीनें विषयांध झालेले आहेत. ६७

**ही अति दिव्य आणि त्रिगुणात्मक अशी माझी माया दुस्तर आहे. जे मलाच शरण येतात ते ही माया [रूप नदी] तरून जातात. ॥१४॥**

तेव्हां आतां, धनंजया, ही महत्तत्त्वादि माझी माया तरून मद्रूप व्हावें, ह्या गोष्टीचा अनुभव कसा यावा? ६८ [कारण] जी मायानदी निर्गुणब्रह्मरूपी पर्वताच्या तुटलेल्या कड्यांत असतांनाच, प्रथम तिच्या ठिकाणीं संकल्परूप जलाचा उगम होऊन पंचमहाभूतांचा लहानसा बुडबुडा आला; ६९ जी सृष्टीच्या विस्ताररूपी ओघानें व कालगतीच्या वेगानें कर्म व मोक्ष यांचे उंच कांठ ओलांडून चालली आहे; ७० जी सत्त्वादि-गुणरूपी मेघांच्या वृष्टीनें भरून भ्रांतिरूप महापुरानें यमनियमरूपी शहरें वाहून नेत आहे; ७१ जिच्यांत द्वेषरूपी भोंवरें असून जी मत्सररूप वळणानें वहात आहे; जिच्यांत उन्मत्तपणा इत्यादि मोठाले मासे तळपत आहेत; ७२ जिच्यांत प्रपंचरूपी भेदांचीं वळणें असून कर्माकर्मांच्या पुरामध्यें सुखदुःखरूपी केरकचरा तरंगत येऊन कडेला लागत आहे; ७३ जीमधील विषयसुखरूपी बेटावर कामरूपी लाटा आदळून त्या ठिकाणीं जीवसमुदायरूपी फेंस पुष्कळ दिसत आहे; ७४ अहंकाररूपी ओघानें, व विद्या, धन, आणि सामर्थ्य या तीन मदांच्या उफळ्यांना ज्या ठिकाणीं विषयतरंगांच्या लाटा उसळताहेत, ७५ उदय आणि अस्त यांच्या लोंढ्यांना जन्ममरणांचे धोंडे पडून त्या ठिकाणीं शरीररूप बुडबुडे उत्पन्न होतात व लय पावतात; ७६ जिच्यांत मोह व भ्रांति हे मासे धैर्य धरून मांस गिळून टाकतात; त्या ठिकाणीं अज्ञानरूपी मोठे भोंवरे फिरत असतात; ७७ भ्रांतिरूप गढूळ पाण्यानें आस्थारूप गाळात रुतून तमोरूपी खळखळाटानें स्वर्गप्राप्तीची गर्जना होत असते; ७८ [असा हा] तमोरूपी प्रवाह तरून जाण्यास अवघड आहे; [येथ] सत्त्वरूपी स्थिर पाण्याचा डोह आहे, किंबहुना ही माया नदी दुस्तर आहे ७९ खरोखर हीमधील जन्ममृत्यूच्या पुराच्या लोंढ्यांत सत्यलोकाचे किल्ले वाहून जातात, आणि ब्रह्मांडरूप धोंड तेव्हांच गडबडत जातात. ८० त्या पुराच्या प्रवाहांत अजून कोणाचे पाय लागत नाहीत! अरे, असा हा मायापूर कोणाच्यानें तरून जाववेल? ८१ आणखी एथें एक मोठेंच नवल आहे. ही नदी तरून जाण्याला जे जे उपाय करावे, ते ते अपायकारकच होतात! ८२ कोणीं आपल्या बुद्धीच्या बळावर [हीमधून तरून जावें म्हणून] हिजमध्यें उडी टाकली, त्यांचा पत्ताच नाहीं; कोणाला ज्ञान-

शुद्धीचि नाहीं । एक जाणिवेचे[2] डोहीं । गर्वेंचि गिळिलें ॥८३॥ एकीं वेदत्रयाचिया[3] सांगडी । घेतल्या अहंभावाचिया[4] धोंडी । ते मदमीनाच्या[5] तोंडीं । सगळेचि गेले ॥८४॥ एकीं वयसेचें जांड[6] बांधलें । मग मन्मथाचिये[7] कासे लागले । ते विषयमगरीं सांडिले । चघळूनियां ॥८५॥ आतां वार्धक्याच्या तरंगा- । माजि मतिभ्रंशाचा जरँगा । तेणें कवळिजताति पैं गा । चहूंकडे ॥८६॥ आणि शोकाचा कडा उपडत[10] । क्रोधाच्या आवर्ती[11] दाटत । आपदागिधीं[12] चुंबिजत[13] । उधवला ठायीं[14]॥८७॥ मग दुःखाचेनि बरेंटें[15] बोबले[16] । पाठीं मरणाचिये रेवे[17] रेवले[18] । ऐसे कामाचे कासे लागले । ते गेले वायां ॥८८॥ एकीं यजनक्रियेची पेटी । बांधोनि घातली पोटीं । ते स्वर्गसुखाच्या कपाटीं[19] । शिरकोनि ठेले ॥८९॥ एकीं मोक्षीं लागावयाचिया आशा । केला कर्मबाह्यांचा[20] भरंवसा । परी ते पडिले वेळसां[21] । विधिनिषेधांच्या ॥९०॥ जेथ वैराग्याची नाव न रिगे । विवेकाचा तांगा[22] न लगे । वरि कांहीं तरों ये योगें । तरी विपाय[23] तो ॥९१॥ ऐसें तरी जीवाचिये आंगवणें[24] । इये मायानदीचें तरणें । हें कासयासारिखें बोलणें । म्हणावें पां ॥९२॥ जरी अपथ्यशीळा व्याधी । कळे साधूसी दुर्जनाची बुद्धी । कीं रागी[25] सांडी सिद्धी । आली सांती ॥९३॥ जरी चोरां सभा दाटे[26] । अथवा मीनां[27] गळ घोटे । ना तरी भेडा[28] उलंटे[29] । पिवसी[30] जरी ॥९४॥ पोंडस[31] वागुर[32] करांडी । कां सुंगी मेरु वोलांडी । तरी मायेची पैलथडी । देखती जीव ॥९५॥ म्हणऊन गा पंडुसुता । जैसी सकामा[33] न जिणवेचि वनिता[34] । तेवीं मायामय हे सरिता[35] । न तरवे जीवां ॥९६॥ येथ एकचि लीला[36] तरले । जे सर्वभावें मज भजले । तयां ऐलीच थडी सरलें । मायाजळ ॥९७॥ जयां सद्गुरुतारूं[37] फुडें । जे अनुभवाचे[38] कासे गाढे[39] । जयां आत्मनिवेदन[40] तरांडें[41] । आकळलें[42] ॥९८॥ जे अहंभावाचें वोझें सांडुनी । विकल्पाचिया झुळका चुकाउनी । अनुरागाचा[43] निरुता[44] होउनी । पाणिढाळु[45] ॥९९॥ जया ऐक्याचिया[46] उतारा । बोधाचा जोडला तांरा[47] । मग निवृत्तीचिया पैल तीरा । झेंपावले[48] जे ॥१००॥ ते उपरतीच्या[49] वावीं सेलत[50] । सोहंभावाचेनि[51] थावें[52] पेलत[53] । मग निघाले अनकळित[54] । निवृत्तितटीं[55] ॥१॥ येणें उपायें मज भजले । ते हे माझी माया तरले । परि ऐसे भक्त विपाइले[23] । बहुवस[56] नाहीं ॥२॥

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यंते नराधमाः ।**
**माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥१५॥**
**चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥१६॥**

**अन्वय**––मायया अपहृतज्ञानाः आसुरं भावम् आश्रिताः दुष्कृतिनः मूढाः नराधमाः मां न प्रपद्यन्ते. ॥१५॥ अर्जुन, [हे] भरतर्षभ, आर्तः, जिज्ञासुः, अर्थार्थी च ज्ञानी [इति] चतुर्विधाः सुकृतिनः जनाः मां भजन्ते. ॥ १६ ॥

जे बहुतां एकां अवांतरें[57] । अहंकाराचा भूतसंचार । जाहाला म्हणोनि विसर । आत्मबोधाचा ॥३॥ ते वेळीं नियमाचें वस्त्र नाठवे । पुढील अधोगतीची लाज नेणवे । आणि करितात जें न करावें । वेदु म्हणे ॥४॥ पाहें पां शरीराचिया गांवा । जयालागीं आले पांडवा । तो कार्यार्थु आघवा । सांडू-

१ थांग. २ ज्ञानाच्या. ३ ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या तीन वेदांच्या. ४ मीपणाच्या. ५ गर्वरूपी माशाच्या. ६ बळ. ७ मदनाच्या. ८ जाळें. ९ बांधले जातात. १० आदळतो. ११ भोंवऱ्यांत. १२ आपत्तिरूप गिधाडांनीं. १३ टोंचले जातात. १४ वर डोकें काढतांच १५ चिखलानें. १६ भरून. १७ वाळूंत. १८ रुततात १९ कपारींत. २० बाहुबळाच्या. २१ वळणांत २२ टिकाव. २३ कचित्. २४ आंगबळानें. २५ विषयासक्त. २६ भरेल. २७ माशाला. २८ भितऱ्याला [पाहून]. २९ भिऊन मागें फिरेल. ३० पिशाच. ३१ हरणाचें पोर. ३२ जाळें. ३३ विषयी पुरुषास. ३४ स्त्री. ३५ नदी ३६ सहज. ३७ नावाडी; तारणारा. ३८ अनुभवाच्या. ३९ बळकट. ४० आत्मा ईश्वरास समर्पण करणें. ४१ तारूं. ४२ सांपडलें. ४३ बायकामुलांवरील प्रेम. ४४ चुकवून. ४५ पाण्याची धार. ४६ जीवब्रह्मांचें ऐक्य. ४७ सांगड. ४८ जाऊन पोहोंचले. ४९ हातांनीं. ५० तरंगतात. ५१ मीच ईश्वर अशा भावाच्या. ५२ बळानें. ५३ पोहतात. ५४ निर्विघ्न. ५५ मुक्तिरूप तटावर. ५६ पुष्कळ. ५७ इतर.

रूपी डोहांत गर्वानें पार गिळून टाकलें; ८३ कोणी वेदत्रयीच्या सांगडीवर बसून तिच्याखालीं मीपणाचे धोंडे बांधून तरून जाण्यास निघाले, ते मदरूपी माशाच्या तोंडांत सबंधच नाहींतसे झाले; ८४ कोणी तारुण्याच्या बळानें कमर कसून मदनाच्या कासेला लागले, तों त्यांना विषयरूप सुसरीनेंच चघळून टाकिलें; ८५ मग ते वार्धक्यरूप लाटांमध्यें तरंगत जात असतां मतिभ्रंशरूप जाळ्यांत सांपडतात, व त्या योगें चहूंकडून जखडले जाऊन ८६ शोकरूप कड्या-वर आदळतात; व पुढें क्रोधरूपी भोंवऱ्यांत सांपड-लेले असतां कोठें वर डोकें करावयास लागले, की आपत्तिरूप गिधाडें त्यांस टोंचटोंचून खाऊं लाग-तात; ८७ आणि मग ते दुःखरूप चिखलांत फसून मरणरूप वाळूंत रुतले जातात ! अशा प्रकारें जे विष-याच्या मार्गे लागले ते फुकट जातात (त्यांचें जिणें व्यर्थ होतें.) ८८ कोणी यज्ञादिक क्रियारूपी पेटा बांधून पोटाखालीं घेतात, ते स्वर्गसुखरूपी कपारींत अडकून राहतात. ८९ कोणी मोक्षप्राप्तीच्या आशेनें कर्मरूप बाहुबलावर भरवसा ठेवतात, परंतु कर्तव्याकर्त-व्यांच्या वळणांत पडतात. ९० त्या नदीमध्यें वैराग्य रूप नांव चालत नाहीं, व विवेकरूप काठी टेंकत नाहीं; तथापि योगानें तरतां येईल, परंतु असें क्वचित् घडून येतें. ९१ अशा प्रकारें, जीवाच्या अंगबळानें ह्या मायारूप नदींतून तरून जातां येतें हें म्हणणें कशा-सारखें आहे म्हणावें, तें सांगतों. ९२ जर पथ्य न करणाराची व्याधि टळेल, साधूला दर्जनाची बुद्धि कळेल, किंवा विषयासक्त पुरुष सिद्धि प्राप्त झाली असतां तिला सोडील; ९३ जर चो-रांची सभा भरेल, अथवा माशाला गळ गिळितां येईल, किंवा भित्र्याला भिऊन पिशाच्च माघारें फिरेल; ९४ जर हरणाचें पाडस जाळें कुरतुडील, किंवा मुंगी मेरु पर्वत ओलांडील, तरच जीवांना [ आपल्या स्वतांच्या शहाणपणानें ] मायानदी तरून पलीकडल्या तीरीं जातां येईल ! ९५ म्हणून, हे पांडुसुता, ज्याप्रमाणें विषयी पुरुषाला स्त्री जिंकवत नाहीं, त्याप्रमाणें ही मायारूप नदी जीवाला तरवत नाहीं. ९६ परंतु जे मला अनन्यभावानें शरण येतात, ते ह्या दुस्तर नदीं-तून सहज तरून जातात. इतकेंच नव्हे, तर ते अली-कडच्या कांठीं असतांनाच मायारूप जल पार नाहीसें होतें. ९७ ज्यांना सद्गुरु हाच नावाडी असून ज्यांनीं ब्रह्माची कांस बळकट धरली आहे, व ज्यांना आत्म-निवेदन हेंच तारूं सांपडलें आहे, ९८ जे अहंभावाचें ओझें टाकून, विकल्परूपी वारा चुकवून, आणि बायका-मुलांच्यावरील प्रेमरूपी पाण्याची धार टाळून, ९९ जी-वात्म्याचें ऐक्य हाच उतार त्या उतारानें बोधरूपी सांगडीच्या आश्रयानें निवृत्तीच्या पलीकडील कां-ठाला जाऊन पोंहोंचतात, १०० ते वैराग्यरूप हात टाकीत 'अहंब्रह्म' ह्या भावाच्या बळावर पोहून मुक्ति तटावर निर्विघ्नपणें निघतात. १ या उपायानें जे मला भजतात, तेच ह्या मायारूप नदीतून तरून जातात; परंतु असे भक्त फार नाहींत, अगदीं विरळा ! २

**मायेनें ज्यांचें ज्ञान नष्ट केलें आहे, व आसुरी प्रकृतीचा ज्यांनीं आश्रय केला आहे, असे पापी व मूर्ख नराधम मला शरण येत नाहींत. १५ अर्जुना, हे भरतश्रेष्ठा, आर्त (रोगादिकांनीं पीडित) जिज्ञासु, (भगवत्तत्त्व जाणण्याची इच्छा करणारा), अर्थार्थी (भोगेच्छु) आणि ज्ञानी असे चार प्रकारचे पुण्यवान लोक मला भजतात. ॥ १६ ॥**

कारण, त्या एकाशिवाय इतर सर्व प्राण्यांना अहंकार-रूप भूताचा संचार झाल्यामुळें आत्मस्वरूपाचा विसर पडतो. ३ त्या वेळीं त्यांस नियमरूपी वस्त्राचें भान राहत नाहीं, अधोगतीची लाज नाहींशी होते, आणि ते वेदबाह्य वर्तणूक करितात. ४ अर्जुना, असें पहा कीं या शरीर-रूप गावांत ज्या कार्याकरितां आले, तो सर्व कार्यभाग

नियां ॥५॥ इंद्रियग्रामींचे [2]राजबिर्दीं । अहंममतेचिया [3]जल्पवादीं । [4]विकारांतरांची [5]मांदी । मेळवूनियां ॥६॥ दुःखशोकांच्या घाईं । मारिलियाची संधि[6] नाहीं । हें सांगावया कारण काई । जे ग्रासिले माया ॥७॥ म्हणोनि ते मातें चुकले । एक [7]चतुर्विध मज भजले । जिहीं आत्महित केलें । वाढतें गा ॥ ८ ॥ तो पहिला [8]आर्तु म्हणिजे । दुसरा [9]जिज्ञासु बोलिजे । तिजा [10]अर्थार्थी जाणिजे । ज्ञानिया चौथा ॥९॥

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः १७**

**अन्वय**--तषां नित्ययुक्तः एकभक्तिः ज्ञानी विशिष्यते. अहं हि ज्ञानिनः अत्यर्थं प्रियः [ अस्मि ] च सः मम प्रियः [ अस्ति ] ॥ १७ ॥

तेथ आर्त तो आर्तीचेनि [11]व्याजें । जिज्ञासु तो जाणावयालागीं भजे । तिजेनि[12] तेणें इच्छिजे । [13]अर्थसिद्धि ॥११०॥ मग चौथियाच्या ठायीं । कांहींचि करणें नाहीं । म्हणोनि भक्तु एकु पाहीं । ज्ञानिया जो ॥ ११ ॥ जे तया ज्ञानाचेनि प्रकाशें । फिटलें भेदाभेदांचें [14]कडवसें । मग मीचि जाहाला [15]समरसें । आणि भक्तुही तेवींचि ॥१२॥ परि आणिकांचिये दिठी नावेक । जैसा स्फटिकुचि अभासे उदक । तैसा ज्ञानी नव्हे कौतुक । सांगता तो॥१३॥ जैसा वारा कां गगनीं विरे । मग वारेपण वेगळें नुरे । तेविं भक्त हे पैज[16] न सरे । जरी ऐक्या आला॥१४॥ जरी [17]पवन हालवूनि पाहिजे । तरी गगनावेगळा देखिजे । येऱ्हवीं गगन तों सहजें । असे जैसें ॥ १५ ॥ तैसें शरीरीं हन कर्मे । तो भक्त ऐसा गमे । परी अंतर्प्रतीतिधर्में । मीचि जाहला ॥१६॥ आणि ज्ञानाचेनि उजिडलेपणें[19] । मी आत्मा ऐसें तो जाणे । म्हणऊनि मीही तैसेंचि म्हणें । [20]उचंबळलासांता ॥१७॥ हां गा [21]जीवापैलीकडिली खुणे । जो पावोनि वावरों जाणे । तो देहाचेनि ेगळेपणें । काय वेगळा होय ॥ १८ ॥

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम्**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम्**

**अन्वय**--एत सर्वे एव उदाराः [ सन्ति; परन्तु ] ज्ञानी तु [ मम ] आत्मा एव [ अस्ति इात ] मे मतं हि; युक्तात्मा सः अनुत्तमां गतिं मां एव आस्थितः [अस्ति]. १८

म्हणोनि आपुलाल्या हिताचेनि लोभें । मज आवडे तोही भक्त शोभे । परी मीचि करी [22]वालभें । ऐसा ज्ञानिया एक ॥ १९ ॥ पाहें पां दुभतेयाचिया आशा । जग धेनूसि करीतसे [23]फांसा । परि दोरेंवीण कैसा । वत्साचा बळी ॥१२०॥ कां जे तनुमनप्राणें । तें आणिक कांहींचि नेणे । देखे तयातें म्हणे । हे माय माझी ॥२१॥ तें येणें मानें अनन्यगती । म्हणूनि धेनुही तैसीचि प्रीती । तयालागीं लक्ष्मीपती । बोलिलें साचें ॥२ ॥ हें असो मग म्हणितलें । जे कां तुज सांगितले । तेही भक्त भले । [24]पाढियंते आम्हां ॥ २३ ॥ परि जाणोनियां मातें । जे पाहीं विसरले मागौतें । जैसें सा॰रा येऊनि [25]सरितें । मुरडावें ठेलें ॥२४॥ तैसी अंतःकरण[26]कुहरीं जन्मली । जयाची [27]प्रतीतिगंगा मज [28]मीनली । तो मी हे काय बोली । फार करूं ॥ २५ ॥ येऱ्हवीं ज्ञानिया जो म्हणिजे । तो चैतन्यचि केवळ माझें । हें न म्हणावें परि काय कीजे । न बोलणें बोलों ॥२६॥

**बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।**
**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः १९**

**अन्वय**--ज्ञानवान् बहूनां जन्मनां अंते ' सर्वं वासुदेवः ' इति मां प्रपद्यते; सः महात्मा सुदुर्लभः [अस्ति] १९

जे तो विषयांची दाट झाडी-। माजि कामक्रोधांचीं [29]सांकडीं । चुकावूनि आला पाडीं । सद्वासनेचिया॥२७॥ मग साधुसंगें सुभटा । उजू सत्कर्मांचिया वाटा ।

१ इंद्रियसमुदायाच्या. २ राजमार्गांत. ३ बडबडीनें. ४ कामक्रोधादिकांची. ५ समुदाय. ६ आठवण. ७ चौघेजण ८ पीडित. ९ ज्ञानप्राप्तीची इच्छा करणारा. १० धनादिकांची इच्छा करणारा. ११ मिषानें. १२ तिसऱ्यानें-अर्थार्थी यानें. १३ द्रव्यप्राप्ति. १४ अंधार. १५ ऐक्यानें १६ बाणा १७ वारा. १८ स्वानुभवानें. १९ उदयाने २० हर्षयुक्त झाला असतां. २१ जीवाच्या स्वरूपापलीकडची-आत्मस्वरूपाची. २२ प्रीति. २३ भाला [ दूध काढतांना गाय लाथा मारीत असेल तर तिला भाला घालावा लागतो. ] २४ आवडते. २५ नदीनें. २६ दरीमध्यें. २७ अनुभवरूपी गंगा. २८ मिळाली. २९ संकटें.

सोडून देऊन ५ या इंद्रियसमुदायरूप राजमार्गावर अहंममतेची बडबड करण्याकरितां कामक्रोधादिक विकारांचा समुदाय गोळा करितात; ६ आणि दुःख व शोक यांचे घाव पडत असतांही त्यांना त्यांची आठवण सुद्धां नसते. हें सांगावयाचें कारण काय म्हणशील, तर ते मायेनें ग्रासलेले असतात, ७ म्हणून मला मुकतात; परंतु फक्त चौघांनींच माझें भजन करून आत्महित वृद्धिंगत केलें. ८ त्या चौघांपैकीं पहिल्याला आर्त, दुसऱ्याला जिज्ञासु, तिसऱ्याला अर्थार्थी, व चौथ्याला ज्ञानी असें म्हणतात १०९

**त्यांमध्यें, ज्ञानी हा निरंतर माझे ठिकाणीं तत्पर असून एकनिष्ठेनें माझी भक्ति करतो, म्हणून श्रेष्ठ आहे. ज्ञान्याला मी अत्यंत प्रिय आहें, व तो मला अत्यंत प्रिय आहे. ॥१७॥**

आर्त हा दुःखनिवारणासाठीं मला भजतो; जिज्ञासु ज्ञानप्राप्तीकरतां भजतो; आणि तिसरा जो अर्थार्थी तो द्रव्यप्राप्तीचे इच्छेनें मला भजतो. ११० परंतु चौथा जो असतो, त्याला कांहींच कर्तव्य नसतांही तो मला भजतो, म्हणून तो एक ज्ञानी पुरुषच माझा भक्त होय हें ध्यानांत ठेव ११ कारण, त्याच्या ज्ञानाच्या प्रकाशानें भेदाभेदरूप अंधकार नाहींसा होतो; व मग त्याचें माझ्याशीं ऐक्य होऊन तो मद्रूप होऊन बसतो, व त्याची भक्तिही तशीच कायम असते. १२ परंतु स्फटिक मणि जसा उदकमय दिसतो, तसा हा ज्ञानी पुरुष इतरांच्या दृष्टीला दिसतो. याचें कौतुक कांहीं सांगतां येत नाहीं. १३ ज्याप्रमाणें वारा हा गगनांत शांत झाल्यावर मग त्याचें वारेपण वेगळें उरत नाहीं, त्याप्रमाणें, हा जरी मद्रूप झाला, तरी त्याचा भक्ताचा बाणा जात नाहीं. १४ जर वारा हालवून पाहिला तर तो गगनाहून वेगळा भासतो, येऱ्हवीं गगन आणि तो ज्याप्रमाणें एकच, १५ त्याच प्रमाणें, शरिरासंबंधी सर्व कर्मांच्या आचरणानें तो माझा भक्त असा वाटतो; परंतु स्वानुभावाच्या योगानें तो मद्रूपच असतो; १६ आणि ज्ञानप्राप्तीच्या उजेडानें मीच त्याचा आत्मा आहें असें तो जाणतो, म्हणून मीही संतोष पावून त्याला आपला आत्मा असें म्हणतों. १७ जो जीवपणाच्या पलीकडील खूण समजून घेऊन व्यवहारांत वागतो, तो देह धारण केल्यामुळें माझ्यापासून वेगळा होईल का पहा बरे! १८

**हे सर्व श्रेष्ठच आहेत; परंतु त्यांत ज्ञानी तर माझा आत्माच असें मी मानितों. कारण, तो माझ्या ठायीं चित्त ठेवून मलाच सर्वोत्तम गति मानून माझा आश्रय करतो. ॥१८॥**

म्हणून, आपल्या हिताकरितां हवा तो मनुष्य माझी भक्ति करतो, परंतु मी ज्याच्यावर प्रीति करतों असा एक भक्त ज्ञानीच होय. १९ हें पहा–दुधाच्या आशेनें सर्व लोक गाईला भाला घालतात; परंतु आपल्या वांसराला भाल्याशिवाय ती कसें दूध पाजिते? १२० कां तर, त्यांला दुसरी कांहीएक गोष्ट माहीत नसून आपल्या तनमनप्राणानें तें आईलाच ओळखीत असतें; आणि जी वस्तु पाहील ती माझी आई आहे असें समजतें. २१ अशा प्रकारें, तें वांसरूं अनन्य भक्त असतें, म्हणून त्याच्यावर गायही तशीच प्रीति करते. यास्तव लक्ष्मीपति ( कृष्ण ) जें बोललें तें खरें. २२ हें असो. मग म्हणतातः—ज्ञान्याशिवाय जे तुला इतर भक्त सांगितले, तेही माझे आवडते आहेत. २३ त्यांना माझें ज्ञान झालें म्हणजे मग ते परत फिरणें विसरतात. ज्याप्रमाणें नदी सागराला मिळाल्यावर तिचें माघारी फिरणें खुंटतें, २४ त्याचप्रमाणें, ज्याच्या अंतःकरणरूपी दरींतून अनुभवरूप गंगा निघून मला मिळाली , तो मद्रूप झाला हें वर्णन किती करूं ! २५ येऱ्हवीं ज्ञानी ज्याला म्हणतात, तो केवळ माझा जीव कीं प्राण होय हें सांगूं नये, पण काय करावें ? ही न बोलण्याची गोष्ट तुला प्रसंगोपात सांगितली. २६

**ज्ञानी पुरुषाला, बहुत जन्मांनंतर, ' सर्व कांहीं वासुदेवरूप आहे ' अशा प्रकारें माझी प्राप्ति होते; असा हा महात्मा फार दुर्लभ आहे. ॥१९॥**

जो विषयरूप दाट झाडींतून कामक्रोधादिक संकटें टाळून व सद्वासनेच्या पहाडावर चढून आला; २७ नंतर, हे वीरश्रेष्ठा अर्जुना, साधूंच्या संगतीनें, सत्कर्मांच्या [illegible] वाटेनें, दुराचरणाच्या आडमार्गाला डाव-

अप्रवृत्तींचा[1] अव्हांटा[2] । डावलूनि ॥२८॥ आणि जन्मशतांचा वाहतेंवणा[3] । तेविंची आस्थेचिया न लेचि वाहणा । तेथ फळहेतूचा उंगाणा[4] । कवणु चाली ॥२९॥ ऐसा शरीरसंयोगाचिये राती–। माजि धांवतां सडियों आयती । तंव कर्मक्षयाची पाहाती[6] । पहांट जाली ॥१३०॥ तैसीच गुरुकृपा उखा उजळली । ज्ञानाची वोतंपली पडली । तेथ साम्याची ऋद्धि उघडली । तयाचिये दिठी ॥ ३१ ॥ ते वेळीं जयाकडे वांस[11] पाहे । तेउता मीचि तया एकु आहे । अथवा निवांत जरी राहे । तऱ्ही मीचि तया ॥३२॥ हें असो आणिक कांहीं । तया सर्वत्र मीवांचूनि नाहीं । जैसें सबाह्य जळ डोहीं । बुडालिया घटा ॥३३॥ तैसा तो मजभीतरीं । मी तया आंतुबाहेरी । हें सांगिजेल बोलेंवरी[12] । तैसें नव्हे ॥ ३४ ॥ म्हणोनि असो हें इयापरी । तो देखे ज्ञानाची वोखारी[13] । तेणें संचरलेनि[14] करी । आप विश्व ॥३५॥ हें समस्तही श्रीवासुदेव । ऐसा प्रतीतिरसाचा[15] वोतला भाव । म्हणोनि भक्तांमाजीं रावो[16] । आणि ज्ञानिया तोचि ॥३६॥ जयाचिये प्रतीतीच्या वोखारां[13] । पवाडु[17] होय चराचरा । तो महात्मा धनुर्धरा । दुर्लभ आथी ॥ ३७ ॥ येर बहुत जोडती किरीटी । जयांचीं भजनें भोगासाठीं । जे आशातिमिरें[18] दृष्टी । विषयांध जाले ॥३८॥

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यंतेऽन्यदेवताः ।**
**तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया २०**

**अन्वय**—तैः तैः कामैः हृतज्ञानाः स्वया प्रकृत्या नियताः [ अज्ञानिनः ] तं तं नियमं आस्थाय अन्य देवताः प्रपद्यंते. ॥ २० ॥

आणि फळाचिया हांवा[19] । हृदयीं कामा जाला रिगावा । कीं तयाचिये घंसणी[20] दिवा । ज्ञानाचा गेला ॥ ३९ ॥ ऐसे उभयंतां[21] आंधारीं पडले । म्हणोनि पासींचि[22] मातें चुकले । मग सर्वभावें अनुसरले[23] । देवतांतरां ॥ १४० ॥ आधींच प्रकृतीचे पाइक । वरी भोगालागीं तंव रंक[24] । मग तेणें लोलुंपत्वें[25] कौतुक । कैसेनि भजती ॥ ४१ ॥ कैंवणी[26] तिया नियमबुद्धि । कैसिया हन उपचारसमृद्धि । कां अर्पण यथाविधि । विहित करणें ॥ ४२ ॥

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धया र्चितुमिच्छति**
**तस्य तस्याऽचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम्**

**अन्वय**—यः यः भक्तः यां यां तनुं श्रद्धया आर्चितुं इच्छति, तां एव तस्य तस्य श्रद्धां अहं अचलां विदधामि. २१

पैं जो जिये[27] देवतांतरीं । भजावयाची चाड[28] करी । तयाची ते चाड पुरी । पुरविता मी ॥ ४३ ॥ देवो देवी मीचि पाहीं । हाही निश्चय त्यासि नाहीं । भाव ते ते ठायीं । वेगळाला धरी ॥ ४४ ॥

**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।**
**लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान्**

**अन्वय**—सः तया श्रद्धया युक्तः तस्याः राधनं ईहते च ततः मया एव विहितान् तान् कामान् लभते हि.॥२२॥

मग तिया श्रद्धायुक्त । तेथिंचें आराधन जें उचित । तें सिद्धीवरी समस्त । वर्तों लागे ॥ ४५ ॥ ऐसें जेणें जें भाविजे । तें फळ तेणें पाविजे । परी तेंही सकळ निपजे । मजचिस्तव ॥ ४६ ॥

**अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।**
**देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि ॥**

**अन्वय**—अल्पमेधसां तेषां तत् फलं तु अन्तवत् भवति; देवयजः देवान् यान्ति, मद्भक्ताः अपि मां यान्ति. २३

परी ते भक्त मातें नेणती । जे कल्पनेबाहेरी न निघती । म्हणोनि कल्पित फळा पावती । अंतवंत[29] ॥ ४७ ॥ किंबहुना ऐसें भजन । तें संसाराचेंचि साधन । येर फळभोग तो स्वप्न । नावभरी दिसे॥४८॥ हें असो परौतें[30] । मग हो कां आवडतें । परि यंजी[31] जो देवतांतें । तो देवत्वासीचि ये ॥ ४९ ॥ येर

१ दुराचरणाचा. २ आडमार्ग. ३ वाटसरू. ४ हिशेब. ५ उपाधिरहित. ६ उजेडानें ७ ज्ञानोदयाची वेळ. ८ उषःकाल. ९ कोंवळें ऊन. १० ऐश्वर्य. ११ वाट; मार्ग. १२ वाचेनें; शब्दांनीं. १३ वखार. १४ संचार करितो. १५ स्वानुभवाचा. १६ श्रेष्ठ. १७ महत्त्व; विस्तार. १८ इच्छारूप अंधकारानें. १९ इच्छेनें. २० संसर्गानें. २१ आंत व बाहेर. २२ जवळ असून. २३ आराधन करूं लागले. २४ दीन. २५ लंपटपणानें. २६ कोणत्या. २७ ज्या ज्या. २८ इच्छा. २९ नाशवंत. ३० पलीकडे. ३१ पूजन करतो.

लून २८ आणि आस्थेच्या ( फलाशेच्या ) वाहणा पायांत न घालतां शेंकडों जन्म भक्तीची वाट चालणारा जो ज्ञानी भक्त, तो फलाच्या हेतूंचा का हिशेब करील ? २९ याप्रमाणें शरीरसंबंधी अज्ञानरूप रात्रींत उपाधिरहित वाट चालत असतां सहज कर्मक्षय होऊन ज्ञानोदयाची पहांट होते. १३० त्याच वेळेस गुरुकृपारूप उषःकाल होतो. आणि मग ज्ञानरूप सूर्याचीं कोंवळीं किरणें पडून समदृष्टीचें ऐश्वर्य त्याच्या दृष्टीस पडतें. ३१ त्या वेळीं तो जिकडे जिकडे पाहातो, तिकडे तिकडे त्याला माझ्याशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं; अथवा तो जरी स्वस्थ बसला, तरी त्याला मीच दिसतों ३२ फार काय सांगावें? त्याला सर्व ठिकाणीं माझ्यावांचून दुसरें कांहीं दिसत नाहीं. ज्याप्रमाणें पाण्यांत बुडालेल्या घटाच्या आंत व बाहेर पाणीच असतें. ३३ त्याप्रमाणें, तो माझ्या आंत व मी त्याच्या अंतर्बाह्य आहें; हें बोलून दाखविण्यासारखें नाहीं, ३४ म्हणून तें असो. याप्रमाणें त्याला ज्ञानाची वखारच दृष्टीस पडते; आणि तो जिकडे जिकडे संचार करितो. तिकडे तिकडे त्याला आपणच विश्व आहों असें भासतें. ३५ या सर्व विश्वांत वासुदेव भरला आहे असा त्याचा पूर्ण अनुभव असतो, म्हणून भक्तांमध्यें तोच सर्वश्रेष्ठ आणि तोच ज्ञानी होय ३६ धनुर्धरा, ज्याच्या अनुभवाच्या वखारींत सर्व चराचर विश्व सांठविलेलें आहे, असा हा महात्मा फार दुर्लभ आहे. ३७ याच्याशिवाय, अर्जुना, पुष्कळ मला भजतात, पण त्यांची भक्ति फक्त विषयसुखाशेनें असते; कारण आशातिमिरानें त्याची दृष्टि विषयांध झालेली असते; ३८

**वेगवेगळ्या कामनांनीं ज्यांचें ज्ञान नाहींसें झालें आहे, आणि जे अज्ञानी आपआपल्या स्वभावाच्या अधीन झालेले आहेत, ते [ ज्या ज्या देवतेचा जो जो उपासनानियम असेल, ] त्या त्या नियमाचें अवलंबन करून [ मज आत्मरूप वासुदेवाहून भिन्न असलेल्या ] इतर देवतांस भजतात. ॥ २० ॥**

आणि फळाच्या इच्छेनें त्याच्या हृदयांत कामाचा रिघाव झाला, की त्याच्या संसर्गानें ज्ञानरूपी दिवा मालवतो. ३९ अशा रीतीनें त्यांना अंतर्बाह्य अंधार होतो, म्हणून मी त्यांच्याजवळ असूनही ते मला अंतरतात; आणि मग सर्व भावानें इतर देवांना भजूं लागतात. १४० अगोदर ते मायेच्या अधीन झालेले, आणि त्यांत फलप्राप्तीकरितां दीन झालेले, मग काय ? ते मोठ्या कौतुकानें लंपट होऊन देवांची कशी भक्ति करितात पण ! ४१ कोणत्या नियमानें व उपचारद्रव्यानें, तसेंच यथाविधि, त्याला काय वस्तु अर्पण केल्या पाहिजेत, इकडे लक्ष देऊन जे जे उपचार त्याला आवडत असतील ते ते करतात ! ४२

**जो जो भक्त ज्या ज्या देवतेच्या ठायीं भक्ति ठेवून श्रद्धेनें आराधना करूं इच्छितो, त्याची त्याची ती श्रद्धा मी त्या त्या देवतेच्या ठायीं स्थिर करतों. ॥ २१ ॥**

परंतु जो जो ज्या ज्या देवतेची फलाकरितां उपासना करितो, त्याची ती इच्छा मीच पुरवितों. ४३ हें पहा—देव—देवी मीच आहें; परंतु त्याचा तसाही निश्चय नसतो, म्हणून त्या त्या देवतांचे ठिकाणीं त्याचा निरनिराळा भाव असतो. ४४

**तो त्या श्रद्धेनें युक्त होऊन त्या देवतेचें आराधन करण्याचा प्रयत्न करतो; आणि मग मींच निर्माण केलेल्या त्याच्या त्या कामना पूर्ण होतात. ॥२२॥**

मग त्यांना ज्या ज्या देवतेची श्रद्धा असेल, त्या त्या देवतेचें, आपली कार्यसिद्धि होईपर्यंत, ते यथाविधि पूजन करितात. ४५ याप्रमाणें ज्यानें जें फल इच्छावें तें त्याला प्राप्त होतें; परंतु तें सर्व माझ्यापासूनच मिळतें. ४६

**[ परंतु अन्य देवतांना भजणाऱ्या त्या ] अल्पबुद्धि मनुष्यांना प्राप्त होणारें तें फल नाशवंत असतें. देवतांचे भक्त देवतांना जाऊन मिळतात; आणि माझे भक्त मला येऊन मिळतात. ॥ २३ ॥**

परंतु ते भक्त मला जाणत नाहींत; कारण ते आशापाशांतून मुक्त होत नाहींत, [ त्यांतच घोंटाळतात; ] आणि म्हणूनच, नाशवंत अशीं इच्छित फळें त्यांना प्राप्त होतात. ४७ किंबहुना अशा प्रकारचें हें भजन म्हणजे संसाराचें साधनच होय. बाकी त्याचा फलभोग म्हणजे स्वप्नांतील क्षणिक सुखाप्रमाणेंच होय. ४८ हें एकीकडे राहूं द्या त्याचें आवडतें दैवत कां असेना ! त्यानें त्या देवतांचें पूजन केलें म्हणजे तो देवत्वच पावतो. ४९

तनुमनप्राणीं । जे अनुसरले माझेयाचि वाहणीं[1] । ते देहाच्या निर्वाणीं[2] । मीचि होती ॥ १५० ॥

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धयः ।**
**परं भावमजानंतो मामव्ययमनुत्तमम् ॥२४॥**

**अन्वय**—मम परं अव्ययं अनुत्तमं भावं अजानन्तः अबुद्धयः अव्यक्तं मां व्यक्तिं आपन्नं मन्यन्ते. ॥२४॥

परी तैसें न करिती प्राणिये । वांयां आपल्या हितीं वाणिये[3] । जे पोंहताति पाणियें । तळहातिंचेनि ॥ ५१ ॥ नाना[4] अमृताच्या सागरीं बुडिजे । मग तोंडा कां वज्रमिठी[5] पाडिजे । आणि मनीं तरी आठविजे । थिल्लरोदकातें[6] ॥ ५२ ॥ हें ऐसें कासया[7] करावें । जें अमृतींही रिगोनि मरावें । तें सुखें अमृत[8] होऊनि कां नसावें । अमृतामाजीं ॥ ५३ ॥ तैसा फळहेतूचा पांजरा[9] । सांडूनियां धनुर्धरा । कां प्रतीतिपांखीं[10] चिदंबरा[11] । गोसांविया[12] नोहावें ॥ ५४ ॥ जेथ उंचावलेनि पैंवाडें[13] । सुखाचा पैसारीं[14] जोडे । आपुलेनि सुरवाडें[15] । उडों ये ऐसा ॥ ५५ ॥ तया उपमा[16] माप कां सुवावें[17] । मज अव्यक्ता व्यक्त कां मानावें । सिद्ध असतां कां निर्मावें[18] । साधनवरी[19] ॥ ५६ ॥ परि हा बोल आघवा । जरी विचारिजे[20] तसे पांडवा । तरी विशेषें या जीवां । न चोजवे[21] गा ॥५७॥

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम्**

**अन्वय**—योगमाया समावृत्तः अहं सर्वस्य प्रकाशः न [ अस्मि ], अयं मूढः लोकः अजं अव्ययं मां न अभिजानाति. ॥ २५ ॥

कां जे योगमायापडळें । हे जाले आहाती आंधळे । म्हणोनि प्रकाशाचेनि देहबळें । न देखती मातें ॥ ५८ ॥ येऱ्हवीं मी नसें ऐसें । काय वस्तु जात असे । पाहें पां लवण जळरसें- । रहित आहे ॥५९॥ पवन कवणातें न शिवेचि । आकाश कें[22] न समायेचि[23] । हें असो एक मीचि । विश्वीं आहें ॥१६०॥

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चाऽर्जुन ।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥**

**अन्वय**—अर्जुन, अहं समतीतानि च वर्तमानानि च भविष्याणि भूतानि वेद; कश्चन मां तु न वेद. ॥ २६ ॥

येथें भूतें जियें अतीतलीं[24] । तियें मीचि होऊनि ठेलीं[25] । आणि वर्तत आहाति जेतुलीं । तींही मीचि ॥ ६१ ॥ कां भविष्यमाणें[26] जियें हीं । तींही मजवेगळीं नाहीं । हा बोलचि येऱ्हवीं कांहीं । होय ना जाय ॥ ६२ ॥ दोराचिया सापासी । डोंबा[27] बडियेॅ नागिंव्हळ[28] ऐसी । संख्या न करवे कोण्हासी । तेवीं भूतांसि मिथ्यत्वें ॥ ६३ ॥ ऐसा मी पंडुसुता । अनुस्यूत[30] सदा असतां । या संसार जो भूतां । तो आनें बोलें ॥ ६४ ॥ तरि तेचि आतां थोडीसी । गोठी सांगिजेल परियेसीं । जेथ अहंकारतनूंसी[31] । वालभ[32] पडिलें ॥ ६५ ॥

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।**
**सर्वभूतानि संमोहं सर्गे यांति परंतप २७॥**

**अन्वय**—[ हे ] परंतप भारत, सर्वभूतानि इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन सर्गे संमोहं यान्ति. ॥ २७ ॥

तेथ इच्छा[33] हे कुमारी जाली । मग ते कामाचिया[34] तारुण्या आली । तेथ द्वेषेंसीं मांडिली । वराडिकें[35] ॥६६॥ तया दोघांस्तव[36] जन्मला । ऐसा द्वंद्वमोह जाला । मग तो आजेयानें वाढविला । अहंकारें ॥६७॥ तो धृतीसि[37] सदां प्रतिकूळु । नियमाही[38] नावेसूळु[39] । आशारसें[40] दोंदिलु[41] । जाला सांता[42] ॥६८॥ असंतुष्टीचिया मदिरा । मत्त होवोनि धनुर्धरा । विषयाचे वोवरीं[43] । विकृतीविणें[44] असे ॥६९॥

---

१मार्गाला. २शेवटीं, अंतकाळीं. ३तोटा करतात. ४अथवा. ५ घट्ट ६ डबक्यांत सांचलेल्या पाण्याला. ७ कां. ८ अमर. ९ पिंजरा; शरीर. १० सर्वव्याप्तीच्या. ११ चिदाकाशास. १२ धनी १३ माहात्म्यानें. १४ फैलावा. १५ इच्छेप्रमाणें १६मापाच्या पलीकडच्याला. १७घालावें १८ शिणावें. १९ सिद्धीपर्यंत. २० विचार करितां. २१ आवडत नाहीं. २२ कोठें. २३ मावत नाहीं. २४ होऊन गेलीं. २५ राहिलीं. २६ पुढें होणारीं. २७ काळा. २८ कवडा. २९ जवसासारखा. ३० अखंड. ३१ शरीराशीं. ३२ प्रीति; सख्य. ३३ अप्राप्त वस्तूविषयीं प्रथम जो विचार मनांत येतो ती इच्छा ३४ ती इच्छा बळावली म्हणजे तिला काम म्हणतात. ३५ लग्नसोहळा. ३६ दोघांपासून. ३७ धैर्याशीं. ३८ इंद्रियदमनासही. ३९ प्रतिकूल. ४० आशारूप दूधानें. ४१ पुष्ट. ४२ असतां. ४३ ओरींत. ४४ विटल्याशिवाय.

बाकी तनमन अर्पण करून जे माझ्याच भक्ति-मार्गाला लागले, ते देहांतीं माझ्याकडे येतात. १५०

**माझा उत्कृष्ट, अविनाशी व अत्युत्तम असा भाव न जाणणारे अज्ञानी लोक मी अव्यक्त असतां मला देहधारी मानतात. ॥ २४ ॥**

पण प्राणी तसें करीत नाहींत, आणि फुकट आपल्या हिताचें नुकसान करून घेऊन [ इतर देवतांच्या पूजनानें अल्प-फलप्राप्ति करून घेऊन ] तळहातावरच्या पाण्यांत पोहल्याप्रमाणें करतात ! ५१ किंवा अमृताच्या समुद्रांत बुडाला असतां मग तोंड दाबून कां धरावें ? आणि मनामध्यें डबक्यांतील पाण्याची आठवण कां करावी ? ५२ अमृतांत शिरून देखील मरावयाचें, हें असें तरी कां करावें ? अमृतांत सुखानें अमृतरूप होऊन कां राहूं नये ? ५३ त्याचप्रमाणें, धनुर्धरा, फलाशारूप पिंजरा टाकून देऊन अनुभव-रूप पंखांनीं [ संचार करून ] चिदाकाशाचे ( भगवत्स्व-रूपाचे ) धनी कां न व्हावें ? ५४ तें चिदाकाश, आपण कितीही उंच उडण्याचें मनांत आणलें तरी सुखानें उडण्यास फैलावलेलें आहे. ५५ त्या मला न मोजतां येणाऱ्याला मापांत कां घालावें ? मज निरा-काराला साकार कां मानावें ? मी सिद्ध असतां माझ्या प्राप्तीकरतां साधनानें कां शिणावें ? ५६ पण, अर्जुना, खरें विचारशील कीं नाहीं, तर बहुतकरून हें बोलणें कोणाला आवडत नाहीं. ५७

**योगमायेनें व्याप्त असा जो मी, तो सर्वांना स्पष्ट दिसत नाहीं. हे मूढ लोक, जन्माला न येणाऱ्या व अविनाशी अशा मला जाणत नाहींत. ॥२५॥**

कां कीं, योगी मायेच्या पडद्यानें आंधळे झालेले असतात; म्हणून, देहबुद्धीच्या बळानें, प्रकाशरूप जो मी त्या मला ते पहात नाहींत. ५८ येऱ्हवीं, मी जींत नाहीं अशी एक तरी वस्तु आहे का ? पहा कीं, कोणतेंही पाणी रसविरहित आहे का ? ५९ वारा कोणाला स्पर्श करीत नाहीं ? आकाश कोठें समावत नाहीं ? हें असो; अवघ्या विश्वांत मीच भरलेला आहें. १६०

**अर्जुना, मागें झालेलीं, सध्यां असणारीं, आणि पुढें होणारीं भूतें मी जाणतों; परंतु मला कोणी जाणत नाहीं. ॥ २६ ॥**

ह्या जगांत जितके प्राणी होऊन गेले, त्यांचे ठि-काणीं मीच होतों, आणि हल्लीं आहेत त्यांतही मीच आहें. ६१ किंवा पुढें होणार आहेत, तेही मज-पासून भिन्न नाहींत; परंतु हें फक्त बोलणें आहे. बाकी कांहीं होत नाहीं, आणि कांहीं जात नाहीं. ६२ ज्याप्रमाणें दोरीच्या सापाविषयीं तो काळा, कवड्या, गव्हाळा वगैरे कांहींच कल्पना करतां येत नाहीं, त्याप्रमाणें, प्राणिमात्र मिथ्या असल्यामुळें तत्संबंधी कोणतीच कल्पना करतां येत नाहीं. ६३ हे पांडुसुता, अशा प्रकारें मी सदा अखंड आहें; प्राणिमात्राच्या मागें जो संसार लागला आहे, त्याचें कारण निराळें आहे. ६४ म्हणून त्याविषयीं थोडीशी गोष्ट सांगतों, ती ऐकः अभिमान व तनु ( शरीर ) या दोहोंची प्रीति जडली; ६५

**हे परंतपा भारता, इच्छा आणि द्वेष यां-पासून उत्पन्न झालेल्या सुखदुःखरूप मोहानें सर्व भूतें वेडावून जाऊन उत्पत्तिकालीं मोठ्या गोंधळांत पडतात. ॥ २७ ॥**

त्या दोघांच्या प्रीतीपासून इच्छारूप कन्या उत्पन्न झाली, व ती आपल्या पूर्ण तारुण्यांत आल्यावर तिचें द्वेषाशीं लग्न लागलें. ६६ त्या दोघांपासून [ सुख-दुःखरूप ] द्वंद्वमोह हा पुत्र झाला. नंतर त्याच्या अहं-कार आजोबांनीं त्याला वाढविलें. ६७ तो द्वंद्वमोह नेहमीं धैर्याला व इंद्रियदमनाला प्रतिकूल, आणि आशारूप दुधानें पुष्ट झालेला आहे. ६८ हे धनुर्धरा, असंतोषरूप मद्यानें उन्मत्त झाल्यामुळें तो विषयांच्या उपभोगाला विटत नाहीं. ६९ त्यानें शुद्ध भक्तीच्या वाटेवर विकल्पाचे कांटे पसरून मग कुमार्गाच्या आड-

तेणें भावशुद्धीचिया[1] वाटे। विखुरले[2] विकल्पाचे[3] कांटे। मग चिरिले अव्हांटे। अप्रवृत्तीचे[4] ॥१७०॥ तेणें भूतें भांबावलीं[5]। म्हणोनि संसाराचिया आडवांमाजि[6] पडिलीं। मग महादुःखाच्या घेतलीं[7]। दांडे[8] वरी॥७१॥

**येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम्।**
**ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रताः २८**

**अन्वय**—येषां पुण्यकर्मणाम् जनानां तु पापं अंतगतं [ अस्ति ], ते दृढव्रताः [ जनाः ] द्वंद्वमोहनिर्मुक्ताः [ संतः ] मां भजंते. ॥ २८ ॥

ऐसे विकल्पाचे वांयाणे[9]। कांटे देखोनि सैणाणे[10]। जे मतिभ्रमाचें पौसावणें[11]। घेतीचिना[12] ॥७२॥ उजू एकनिष्ठेच्या पाउलीं। रगडूनि विकल्पाचिया भालीं[13]। महापातकांची सांडिली। अटवी[14] जिहीं ॥७३॥ मग पुण्याचे धांवा[15] घेतले। आणि माझी जवळीक पावले। किंबहुना ते चुकले। वाटवधेयां[16] ॥७४॥

**जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतंति ये।**
**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम्**

**अन्वय**—ये मां आश्रित्य जरामरणमोक्षाय यतंति, ते तत् ब्रह्म, कृत्स्नं अध्यात्मं च अखिलं कर्म विदुः ॥२९॥

येऱ्हवीं तरी पार्था। जन्ममरणाची निमे[17] कथा। ऐसिया प्रयत्नातें आस्था। विये[18] जयाची ॥ ७५ ॥ तया तो प्रयत्नचि एके वेळे। मग समग्र परब्रह्में फळे। जथा पिकलेया रसु गळे। पूर्णतेचा ॥ ७६ ॥ ते वेळीं कृतकृत्यता जग भरे। तेथ अध्यात्माचें[19] नवलपणें[20] पुरे। कर्माचें काम सरे। विरमे[21] मन ॥७७॥ ऐसा अध्यात्मलाभ तया। होय गा धनंजया। भांडवल जया। उद्यमीं[22] मी ॥ ७८ ॥ तयातें साम्या[23]-चिये वाढी[24]। ऐक्याची सांदे[25] कुळवाडी[26]। तेथ भेदाचिया दुबळवाडी[27]। नेणिजे तया ॥ ७९ ॥

**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः।**
**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ३०**

**अन्वय**—ये साधिभूताधिदैवं च साधियज्ञं मां विदुः, ते युक्तचेतसः प्रयाणकाले अपि च मां विदुः. ॥ ३० ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

जिहीं साधिभूतां[28] मातें। प्रतीतीचेनि[29] हातें। धरूनि अधिदैवातें[30]। शिवतलें गा ॥ १८० ॥ जया ज्ञाणिवेचेनि[31] वेगें। मी अधियज्ञु[32] दृष्टी रिगे। ते तनूचेनि वियोगें। विऱ्हैये[33] नव्हती ॥ ८१ ॥ येऱ्हवीं आयुष्याचें सूत्र विघडतां। भूतांची उमटे खडाडतां[34]। काय न मरतयाहि चित्ता। युगांत[35] नोहे ॥ ८२ ॥ परी नेणों कैसें पैं गा। जे जडोनि गेले माझिया आंगा। ते प्रयाणींचिया लगबगा। न सांडितीच मातें ॥ ८३ ॥ येऱ्हवीं तरी जाण। ऐसे जे निपुण। तेचि अंतःकरण-। युक्त योगी ॥ ८४ ॥ तंव इये शब्दकुपिकेतळीं[36]। नोडवेचि[37] अवधानाची अंजुळी। जे नावेक अर्जुन तये वेळीं। मागांचि होता ॥ ८५ ॥ जेथ तद्ब्रह्मवाक्यफळें[38]। जियें नानार्थरसें रसाळें। बहकतें[39] आहाति परिमळें। भावाचेनि[40] ॥ ८६ ॥ सहज कृपामंदानिळें[41]। श्रीकृष्णद्रुमाचीं[42] वचनफळें। अर्जुनश्रवणाचिये खोळे[43]। अवचित पडिलीं ॥ ८७ ॥ तियें प्रमेयांचीं[44] हो कां वळलीं। कीं ब्रह्मरसाच्या सागरीं चुबुकळिलीं। मग तैसींच का घोळिलीं। परमानंदें ॥ ८८ ॥ तेणें बरवेपणें निर्मळें। अर्जुना उन्मेषांचे[45] डोहाळे। घेताति गळाळे[46]। विस्मयामृताचे ॥ ८९ ॥ तिया सुखसंपत्ति जोडलिया। मग स्वर्गा वांये[47] वांकुलिया। हृदयाच्या जीवीं गुंतकुलिया[48]। होत आहाती ॥ १९० ॥ ऐसें वरिचिलीचि[49] बरवा। सुख जावों लागलें फांवा[50]। तंव

१ शुद्ध भक्तीच्या. २ पसरले. ३ संशयात्मक बुद्धीचे. ४ कुमार्गाचे. ५ भ्रमिष्ट झालीं. ६ अरण्यांत. ७ स्वाधीन झालीं. ८ सपाटे. ९ व्यर्थ. १० तीक्ष्ण. ११ जवळ होणें. १२ मानीत नाहींत. १३ कांट्यांनीं. १४ अरण्य. १५ मदत. १६ वाटमाऱ्यांना. १७ संपे. १८ उत्पन्न करते. १९ आत्मज्ञानाचें. २० नवाई. २१ शांत होतें. २२ व्यापारांत. २३ समदृष्टीच्या. २४ व्याजानें २५ सिद्ध होते. २६ संपात्ति. २७ दैन्य. २८ नाशवंत भूतांसह. २९ अनुभवाच्या. ३० मायावश जीवाला. ३१ ज्ञानाच्या. ३२ परमात्मा. ३३ दुःखी. ३४ क्षोभ. ३५ प्रळयकाळ. ३६ शब्दरूप कुपीच्या खालीं. ३७ प्राप्त झाली नाहीं. ३८ ब्रह्मप्रतिपादक. ३९ पसरले. ४० इच्छेच्या. ४१ मंद. ४२ श्रीकृष्णरूप वृक्षाचीं. ४३ ओट्यांत. ४४ वेदांतासिद्धांताचीं. ४५ ज्ञानाचे. ४६ घोंट. ४७ दाखवी. ४८ गुदगुल्या. ४९ वरकांतीं. ५० विस्ताराप्रत.

वाटा काढिल्या आहेत. १७० त्या योगानें प्राणिमात्र भ्रम पावून संसाररूप अरण्यांत पडतात, व त्यांना महादुःखाचे सपाटे सोसावे लागतात. ७१

**परंतु पुण्यकर्माच्या योगानें ज्यांचें पातक लयास गेलें आहे, ते दृढनिश्चयी जन सुख-दुःखांच्या मोहापासून मुक्त होऊन मला भजतात. ॥ २८ ॥**

याप्रमाणें विकल्पाचे तीक्ष्ण परंतु निष्फळ कांटे पाहून, ज्यांपासून मतिभ्रम उत्पन्न होतो त्यांना जे मानीत नाहींत; ७२ भक्तीच्या एकनिष्ठेच्या पावलांनी जे नीट जातांना विकल्पाचे कांटे चिरडून टाकतात, ते महापातकांचें अरण्य टाकून सरळ मार्गानें जातात. ७३ नंतर, पुण्याच्या मार्गानें लवकर चालून माझें सान्निध्य पावतात, आणि अशा रीतीनें वाटमाऱ्यांच्या (कामक्रोधादिकांच्या) हातून सुटतात! ७४

**जे माझ्या आश्रयानें जरामरणांपासून मुक्त होण्यासाठीं यत्न करतात, ते तें ब्रह्म जाणतात; आणि सर्व अध्यात्माला व सर्व कर्मालाही जाणतात. ॥ २९ ॥**

येऱ्हवीं, पार्था, जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटावें असें जें साधन आहे, त्याच्या प्राप्तीची ज्यांना इच्छा उत्पन्न होते, ७५ त्यांना त्यांचा तो प्रयत्न फलद्रूप होऊन ब्रह्मप्राप्ति होते, व पिकलेल्या फळांच्या रसाप्रमाणें ते पूर्णतेस पावतात. ७६ त्या वेळीं, आम्ही धन्य आहों, असें त्यांना वाटून सर्व जगभर आनंद भरलेला दिसतो: नंतर आत्मज्ञानाची होस पुरी होऊन व कर्में जागच्या जागीं राहून त्यांचें मन शांत होतें. ७७ हे धनंजया, अशा रीतीनें त्यांना आत्मज्ञानाचा लाभ होतो; कारण, त्यांच्या या परमार्थरूप व्यापारांत भांडवल मीच आहें. ७८ त्यांना समदृष्टि हेंच व्याज मिळून ऐक्यरूप संपत्तीची समृद्धि होते, यामुळें भेदरूप दैन्याची ओळखही रहात नाहीं. ७९

**जे योगी अधिभूत, अधिदैव आणि अधियज्ञ यांसह मला जाणतात, ते स्वस्थचित्त पुरुष मरणकालींही मला जाणतात. ॥ ३० ॥**

ज्यांनीं अनुभवाच्या हातांनीं मायावश जीवाला धरून पांचभौतिकासह मला स्पर्श केला, १८० ज्यांच्या ज्ञानाच्या वेगानें मला अधियज्ञ या दृष्टीनें पाहिलें, त्यांना शरिराच्या वियोगानें (मरणसमयीं) दुःख होत नाहीं. ८१ येऱ्हवीं, आयुष्याची दोरी तुटावयाचे बेतांत आली असतां प्राण्यांची जी खळबळ उडून जाते, ती पाहून न मरणारांच्या चित्ताला सुद्धां युगांत ओढवल्यासारखें नाहीं का होत? ८२ परंतु जे मद्रूप झाले, ते प्राणांतींही मला सोडीत नाहींत. हें कसें होतें तें मला सांगतां येत नाहीं. ८३ येऱ्हवीं असें पक्कें समज कीं, जे अशा प्रकारें पूर्ण ज्ञानी आहेत, तेच अंतःकरणापासून माझें ऐक्य पावले आहेत. ८४ हें तत्त्व सांगते वेळीं श्रीकृष्णाच्या मुखांतील शब्दरूप कुपीच्या खालीं अर्जुनाची अवधानरूप ओंजळ नव्हती. कारण त्याचें लक्ष क्षणभर दुसरीकडे होतें. ८५ त्या ठिकाणीं तीं ब्रह्मप्रतिपादक वाक्यें हींच फळें पुष्कळ अर्थरूपी रसानें भरलेलीं होतीं, व त्यांचा भक्तिरूप सुवास चोहींकडे पसरला होता. ८६ त्या वेळीं कृष्णकृपारूप मंद वाऱ्याच्या योगानें, श्रीकृष्णरूप वृक्षापासून वचनरूप फळें अर्जुनाच्या श्रवणरूप ओटींत सहज येऊन पडलीं! ८७ तीं फळें वेदांतसिद्धांतांचींच बनलेलीं, ब्रह्मरसाच्या सागरांत बुचकळलेलीं, व तशींच परमानंदरूप साखरेंत घोळलेलीं होतीं. ८८ अशा रीतीनें बनलेलीं जीं निर्मळ फळें, त्यांच्या अर्थरूपी गर्भाचा लाभ व्हावा अशी अर्जुनास इच्छा उत्पन्न होऊन तो विस्मयरूप अमृताचे घोंट घेऊं लागला. ८९ अशा रीतीचें सुख झाल्यावर तो स्वर्गसुखाला वेडावून दाखवूं लागला, व त्याच्या अंतःकरणांत गुदगुल्या होऊं लागल्या. १९० याप्रमाणें त्या फळांचें बाहेरील स्वरूप पाहून त्याचा आनंद वाढूं लागला. त्या वेळेस त्या फळांची

रसस्वादाचिया हांवा[1]। लाहो[2] केला ॥९१॥ झडकरी अनुमानाचेनि करतळें। घेऊनि तियें वाक्यफळें। प्रतीतिमुखीं एके वेळे। घालूं पाहे ॥९२॥ तंव विचाराचिया रसना न दाटती। वरी हेतूच्या दशनीं[3] न फुटती। ऐसें जाणोनि सुभद्रापती। चुंबीचिना९३ मग चमत्कारला म्हणे। इयें जळींचीं मा[4] तारांगणें। कैसा झकविलों[5] असलागपणें[6]। अक्षरांचेनि ॥९४॥ इयें पदें नव्हती फुंडिया। गगनाचिया घडिया। येथ आमुची मति बुडालिया। थाव न निघे ॥९५॥ वांचूनि जाणावयाची कें[9] गोठी। ऐसें जीवीं कल्पूनि किरीटी। तिया पुनरपि केली दृष्टी। यादवेंद्रा॥९६॥ मग विनविलें सुभटें। हां हो जी यें एंकवाटें[10]। सातही पदें अनुच्छिष्टें[11]। नवलें आहाती ॥९७॥ येऱ्हवीं अवधानाचेनि वहिलेपणें[12]। नाना प्रमेयांचे उगाणे[13]। काय श्रवणाचेनि आंगवणें[14]। बोलों लाहाती[15] ॥९८॥ परि तैसें हें नोहेचि देवा। देखिला अक्षरांचा मेळावा। आणि विस्मयाचिया जीवा। विस्मयो जाला ॥९९॥ कानाचेनि गवाक्षद्वारें[16]। बोलाचे रश्मी[17] अभ्यंतरें। पाहेना तंव चमत्कारें। अवधान ठाकलें॥२००॥ तेविंचि अर्थाची चाड मज आहे। ते सांगतांही वेळ न साहे। म्हणूनि निरूपण लवलाहें[19]। कीजो देवा ॥१॥ असा मागील पडताळा घेउनी। पुढां अभिप्राय दृष्टी सूनी[20]। तेविंचि माजी शिरउनी। ओती[21] आपुली ॥२॥ कैसी पुसती पाहे पां जाणिवें[22]। भिडेंचि तरी लंघों नेदी शिंवें[23]। येऱ्हवीं श्रीकृष्णहृदयासि खेंवें[24]। देवों सरला ॥ ३ ॥ अहो श्रीगुरूतें जें पुसावें। तें येणें मानें सावध व्हावें। हें एकचि जाणें आघवें। सव्यसाची ॥ ४ ॥ आतां तयाचें तें प्रश्न करणें। वरी सर्वज्ञ श्रीहरीचें बोलणें। हें संजयो आवडलेपणें[25]। सांगेल कैसें ॥ ५ ॥ तिये अवधान द्यावें गोठी। बोलिजेल नीट मऱ्हाटी। जैसी कानाचे आधीं दृष्टी। उपयोगा जाये ॥ ६ ॥ बुद्धीचिया जिभा। बोलाचा न चाखतां गाभा[26]। अक्षरांचिया भांबा[27]। इंद्रियें जिती ॥ ७ ॥ पहा पां मालतीचे कळे। घ्राणासि[28] कीर वाटले परिमळें। परि वरचिया बरवा[29] काइ डोळे। सुखिये नव्हती ॥ ८ ॥ तैसें देशियेचिया[30] हेवाचा[31]। इंद्रियें करिती राणिवा[32]। मग प्रमेयाचिया[33] गांवा। लेसा[34] जाइजे ॥ ९ ॥ ऐसेनि नागरपणें[35]। बोलें निमे[36] तें बोलणें। ऐका ज्ञानदेव म्हणे। निवृत्तीचा २१०

इति श्रीज्ञानेश्वरविरचितायां भावार्थदीपिकायां सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥ श्लोक ३०, ओं. २१०.

---

१ इच्छेस. २ प्रारंभ. ३ दांतांनीं. ४ अहो. ५ फसलों. ६ सुंदरपणानें. ७ खऱ्या. ८ अंत. ९ दूरापास्त. १० एकत्र. ११ स्वाद न घेतलेलीं. १२ नसल्यामुळें. १३ तात्पर्यार्थ. १४ बळानें. १५ सांपडतात. १६ झरोक्यांतून. १७ किरण. १८ उजाडलें नाहीं. १९ लवकर. २० ठेवून. २१ इच्छा. २२ ज्ञान. २३ मर्यादेची. २४ आलिंगन २५ प्रेमानें. २६ सार. २७ शोभा. २८ नाकाला. २९ सुरेखपणा. ३० देशी भाषेच्या. ३१ शोभेनें. ३२ राज्य. ३३ सिद्धांताच्या. ३४ त्वरित. ३५ सुंदरपणें. ३६ बोल बंद करणारें.



चव घेण्याची जिभेला इच्छा उत्पन्न झाली. ९१ म्हणून लवकर अनुमानरूप हस्तावर तीं श्रीकृष्णवाक्यरूप फलें घेऊन तीं तो अनुभवरूप मुखांत एकदम घालूं लागला. ९२ त्या वेळीं विचाररूप जिभेनें तीं घेतां येईनात, व हेतुरूप दांतांनीं फुटेनात असें जाणून, सुभद्रापति जो अर्जुन तो त्यांना तोंड लावीना. ९३ मग चमत्कार वाटून असें म्हणतो कीं, " अहो, पाण्यांत दिसणाऱ्या नक्षत्रांप्रमाणें या अक्षरांच्या सुंदरपणानें अक्षरांना फल समजून मी कसा फसलों ! ९४ हीं अक्षरांचीं पदें नसून केवळ आकाशाच्या घड्या आहेत, व ह्यांत आमच्या बुद्धीनें किती जरी बुड्या मारल्या, तरी कांहीं थांग लागावयाचा नाही. " ९५ [ तेव्हां हीं फलें घेतां येत नाहींत तर ] मग तीं जाणतां कशीं येतील ? असें अर्जुनानें मनांत आणून पुनः यादवेंद्र श्रीकृष्णाकडे पाहिलें. ९६ मग अर्जुनानें देवाची विनंती केली कीं, " देवा, हीं जीं एकवटलेलीं सात पदें, त्यांचा कधींही कोणी स्वाद घेतला नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे. ९७ एरवीं, लक्षपूर्वक ऐकत नसतां, केवळ श्रवणाच्या जोरावर ( लक्ष नसतां श्रवण केलेलें असेल तर ) अनेक [ साधारण ] सिद्धांतांचे तात्पर्यार्थ तरी बोलून दाखवितां येतील का ? ९८ [ नाहीं ! ] आणि त्यांतूनही, देवा, आपलें हें बोलणें कांही साधारण नव्हे. हीं अक्षरें नुसतीं पाहिल्यावर विस्मयाला देखील मोठें आश्चर्य वाटेल. ९९ कानाच्या झरोक्यांतून बोलरूपी किरण आंत शिरले नाहींत, तोंच चमत्कार वाटून माझें लक्ष खुंटलें ( मति चालेना. )२०० त्या शब्दांचा अर्थ समजण्याची मला फार इच्छा आहे असें म्हणण्यांत जो वेळ चालला आहे, तोही मला सहन होत नाहीं. म्हणून, देवा, लवकर सांगा. " १ याप्रमाणें, मागील प्रत्यंतर घेऊन, पुढल्या अभिप्रायावर दृष्टि ठेवून व मध्येंच आपली ऐकण्याची इच्छा दर्शवून अर्जुनानें विचारलें. २ अर्जुनाची प्रश्न करण्याची काय शैली आहे पहा ! कीं मर्यादेचें उल्लंघन न करितां श्रीकृष्णाच्या हृदयाला प्रेमालिंगन देण्यास तो तयार झाला ! ३ अहो, श्रीगुरूंना ज्या वेळेस पुसावयाचें, त्या वेळेस अशाच मर्यादेनें पुसावें लागतें. त्यांची मर्यादा कायम ठेवून कसें पुसावें हें फक्त एक सव्यसाची अर्जुनच जाणतो. ४ आतां त्याचें तें प्रश्न करणें, आणि त्यावर सर्वज्ञ श्रीहरीचें उत्तर देणें, हें संजय कशा प्रेमानें सांगेल तें पहा. ५ जी गोष्ट नीट मराठी भाषेंत सांगितली जाईल तिच्याकडे नीट लक्ष द्या. असें कीं, ज्या योगानें कानाच्या अगोदर दृष्टीला अर्थ दिसेल. ६ बुद्धिरूप जिभेनें त्या शब्दांचा रस न चाखतां, अक्षरांच्या शोभेनें इंद्रियें तटस्थ व्हावीं. ७ पहा कीं, मालती पुष्पाच्या कळ्यांचा स्वाद नाकाला खरोखर येईल. परंतु त्याच्या बाहेरील सुरेखपणानें डोळ्यांना सुख होणार नाहीं का ? ८ त्याचप्रमाणें, मराठी भाषेच्या शोभेनें इंद्रियें सुखाचें राज्य करतील, व मग त्वरित सिद्धांताच्या गांवाला जातील. ९ अशा सुंदरपणानें जें बोलणें ऐकल्यापासून बोलणें बंद होतें, तें ऐका, असें निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतात. २१०



# ज्ञानेश्वरी.

## अध्याय आठवा.

अर्जुन उवाच—

**किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम ।**
**अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥१॥**

**अन्वय**–पुरुषोत्तम ! तत् ब्रह्म किं ? अध्यात्मं किं ? [ च ] कर्म किं ? अधिभूतं किं प्रोक्तं ? च अधिदैवं किम् उच्यते ? ॥ १ ॥

मग अर्जुनें म्हणितलें । हां हो जी अवधारिलें । जें म्यां पुसिलें । तें निरूपिजे ॥ १ ॥ सांगा कवण तें ब्रह्म । कायसया नाम कर्म । अथवा अध्यात्म । काय म्हणिपे ॥ २ ॥ अधिभूत तें कैसें । एथ अधिदैवत तें कवण असे । हें उघड मी परियेसें । ऐसें बोला ॥ ३ ॥

**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ।**
**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः २**

**अन्वय**–मधुसूदन, अत्र अस्मिन् देहे अधियज्ञः कः [ च ] कथं [ अस्ति ] ? च प्रयाणकाले नियतात्मभिः त्वं कथं ज्ञेयः असि ? ॥२॥

देवा अधियज्ञ तो काई । कवण पां इये देहीं । हें अनुमानासि कांहीं । दिठी न भरे ॥ ४ ॥ आणि नियता[1] अंतःकरणीं । तूं जाणिजैसी[2] देहप्रयाणीं[3] । तें कैसेनि हें शार्ङ्गपाणी । परिसवा मातें ॥ ५ ॥ देखा धवळारीं[4] चिंतामणीचा । जरी पहुडला होय दैवाचा । तरी वोसणतांही[5] बोल तयाचा । सोपें[6] न वचे ॥६॥ तैसें अर्जुनाचिया बोलासवें । आलें तेंचि म्हणितलें देवें । परियेसें गा बरवें । जें पुसिलें तुवां ॥ ७ ॥ किरीटी कामधेनूचा पाडा । वरी कल्पतरूचा आहे मांदोडा । म्हणोनि मनोरथसिद्धीचिया चाडा । तो नवल नोहे ॥ ८ ॥ श्रीकृष्ण कोपोनि ज्यासि मारी । तो पावे परब्रह्मसाक्षात्कारीं । मा कृपेनें उपदेशु करी । तो कैशापरी न पवेल ॥९ ॥ जैं कृष्णचि होईजे आपण । तैं कृष्ण होय आपुलें अंतःकरण । मग संकल्पाचें आंगण । वोळंगती सिद्धी ॥ १० ॥ परि ऐसें जें प्रेम । तें अर्जुनींचि आथि निःसीम । म्हणऊनि तयाचे काम । सदां सफळ ॥११॥ या कारणें श्रीअनंतें । तें मनोगतें तयाचें पुसतें । होईल जाणूनि आइतें । वोगरूनि ठेविलें ॥१२॥ जें अपत्य थानौनि निगे[11] । तयाची भूक ते मातेसीचि लागे । येऱ्हवीं तें शब्दें काय सांगे । मग स्तन्यें[12] दे येरी॥१३॥ म्हणवोनि कृपाळुवा गुरूचिया ठायीं । हें नवल नोहे कांहीं । परि तें असो आइका काई । जें देव बोलते जाहले ॥ १४ ॥

श्रीभगवानुवाच—

**अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।**
**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥**

**अन्वय**–अक्षरं परमं ब्रह्म उच्यते; स्वभावः अध्यात्मं उच्यते;भूतभावोद्भवकरः विसर्गः कर्मसंज्ञितः [अस्ति.]॥३॥

मग म्हणितलें सर्वेश्वरें । जें आकारीं इये खोंकरें[13] । कोंदलें[14] असत न[15] खिरे । कवणे काळीं ॥१५॥ येऱ्हवीं सपूरपणें[16] तयाचें पहावें । तरि शून्यचि नव्हे स्वभावें । वरि गगनाचेनि पालवें[17] । गाळूनि घेतलें ॥१६॥ जें ऐसेंही परि विरुळें[18] । इये विज्ञानाचिये[19] खोळे[20] । हालवलेंही न गळे । तें परब्रह्म ॥१७॥ आणि

१ स्वाधीन. २ ओळखतां येशील. ३ अंतकाळीं. ४ मंदिरांत. ५ बरळला तरी. ६ व्यर्थ. ७ मंडप. ८ मग. ९ आलिंगितात; रावतात. १० वाढून. ११ दूर होतें. १२ स्तनपान. १३ फुटक्या. १४ दाट भरलेलें. १५ नाश पावत नाहीं. १६ सूक्ष्मपणा. १७ पदरानें. १८ पातळ. १९ व्यावहारिक ज्ञानाच्या. २० मोटेंतून ( शरिरांतून. )

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय आठवा.

**अर्जुन म्हणाला, " हे पुरुषोत्तमा, तें ब्रह्म म्हणजे काय ? अध्यात्म म्हणजे काय ? कर्म म्हणजे काय ? अधिभूत कशाला म्हणतात ? आणि अधिदैव कशाला म्हणतात ? ॥ १ ॥**

मग अर्जुन म्हणाला, " अहो देवा ! ऐकलें का ? मीं जें विचारलें तें मला स्पष्ट करून सांगा. १ ब्रह्म कोणतें, कर्म कशाचें नांव, अथवा अध्यात्म कशाला म्हणतात, २ अधिभूत कसें, आणि या जगांत अधिदैवत कोण आहे, हें मला नीट समजेल असें सांगा. ३

**"हे मधुसूदना, या देहामध्यें अधियज्ञ तो कोण व कसा आहे ? आणि ज्यांनीं अंतःकरण जिंकलें आहे असे योगी मरणकालीं तुला कसे जाणतात ? " ॥ २ ॥**

"देवा, अधियज्ञ तो काय, व तो या देहांत कोणता, हें अनुमानानें नीट लक्षांत येत नाहीं. ४ हे शार्ङ्गपाणि, ज्यांनीं अंतःकरण स्वाधीन करून घेतलें आहे, त्यांना अंतःकालीं तुम्हांला कसें ओळखतां येतें, हें मला चांगल्या रीतीनें समजवा."५ [ज्ञानेश्वर म्हणतात,] पहा कीं, चिंतामणीच्या मंदिरांत एखादा दैववान मनुष्य जर निजला, तर तो जरी झोंपेंत बरळला तरी त्याचें बरळणें व्यर्थ जात नाहीं. ६ त्याचप्रमाणें, अर्जुनाच्या मुखांतून जीं वाक्यें आलीं त्याबरोबर देव म्हणाले, " तूं जें कांहीं पुसलेंस तें नीट ऐक." ७ किरीटी हा कामधेनूचा बछडा असून कल्पतरूच्या मंडपांत बांधलेला आहे, अर्थात् त्याच्या मनांतील सर्व हेतु सिद्धीस जातात यांत नवल तें काय ? ८ श्रीकृष्ण ज्याला रागावून मारतात, तो देखील ब्रह्मस्वरूपाला पावतो; मग ज्याला कृपादृष्टीनें उपदेश करतील, त्याला काय प्राप्त होणार नाहीं ? ९ ज्या वेळेस कृष्णाचे आपण भक्त व्हावें, त्या वेळीं आपलें अंतःकरण कृष्णरूप बनतें; मग संकल्परूप आंगणांत ( आपल्या मनांत जे जे संकल्प येतील, ते ते पूर्ण करण्याकरितां ) ऋद्धिसिद्धि सहज हात जोडून उभ्या असतात. १० परंतु अशा प्रकारचें जें निस्सीम प्रेम, तें एक अर्जुनाच्या ठिकाणींच अमर्याद आहे, म्हणून त्याच्या मनोकामना नेहमीं पूर्ण होतात. ११ म्हणूनच, अर्जुन हा आतां आपल्या मनांतील गोष्ट मला विचारील, असें जाणून श्रीकृष्णांनीं आयतेंच उत्तराचें ताट वाढून ठेविलें. १२ स्तनपान करून दूर खेळत असलेल्या बालकाला भूक लागली आहे, हें त्याच्या आईलाच समजतें. नाहीं तर त्यानें मागितल्यावर मग का ती त्याला दूध पाजते ? १३ अर्थात् कृपाळू अशा सद्गुरूचे ठिकाणीं [ आपल्या शिष्यासंबंधी ] असलें हें प्रेम असणें म्हणजे कांहीं नवल नव्हे. पण हें असो; देव जें कांहीं बोलले तें ऐका. १४

**भगवान म्हणाले:—ब्रह्म हें अविनाशी व श्रेष्ठ आहे; स्वभाव ( ब्रह्माचें शरीरांत असणें ) म्हणजे अध्यात्म; आणि प्राण्यांच्या उत्पत्तीला कारण असलेला जो विसर्ग ( यज्ञामध्यें चरुपुरोडाशादिकांचें प्रदान ) त्याला कर्म म्हणतात. ॥ ३ ॥**

मग सर्वेश्वर म्हणाले:-जें या फुटक्या आकारांत (देहांत ) ओतप्रोत भरलेलें असून कोणत्याही वेळीं नाश पावत नाहीं; १५ बरें, त्याचा सूक्ष्मपणा पहावा, तर स्वभावतः तें शून्य नव्हे, पण अति पातळ अशा आकाशाच्या पदरानें गाळून घेतलेलें आहे; १६ 'अशा प्रकारचें जें विरळ आहे व जें प्रापंचिक ज्ञानाच्या मोटेंतून ( शरीरांतून ) हालवलें असतांही गळत नाहीं, त्याला ' परब्रह्म ' असें म्हणतात; १७ आणि आकार म्हणजे शरीर हें जन्मास आल्यानें त्याचे जे धर्म

आकाराचेनि जालेपणें । जन्मधर्मातें नेणे । आकारलोपीं निमणें[1] । नाहीं कहीं ॥ १८ ॥ ऐशिया आपुलियाची सहज स्थिती । जया ब्रह्माची नित्यता[2] असती[3] । तया नाम सुभद्रापती । अध्यात्म[4] गा ॥ १९ ॥ मग गगनीं जेविं निर्मळें । नेणों कैंचीं एक वेळे । उठती घनपटळें[5] । नानावर्णें ॥ २० ॥ तैसे अमूर्तीं[6] तिये विशुद्धें । महदादि[7] भूतभेदें । ब्रह्मांडाचे बांधे[8] । होंचि लागती ॥ २१ ॥ पैं निर्विकल्पाचिये[9] बरडी[10] । फुटे आदिसंकल्पाची[11] विरूढी[12] । आणि [13]ते सवेंचि मोडोनि ये ढोंढी । ब्रह्मगोळकांच्या[14] ॥ २२ ॥ तया एकैकाचे भीतरीं[15] पाहिजे । तंव बीजाचाचि भरिलीं[16] देखिजे । माजि होतिया जातिया नेणिजे । लेख जीवां ॥ २३ ॥ मग तया ब्रह्मगोळकांचे अंशांश । प्रसवती आदिसंकल्प असमास[17] । हें असो ऐसी बहुवस । सृष्टी वाढे ॥ २४ ॥ परि दुजेनविण एकला । परब्रह्मचि संचला । अनेकत्वाचा आला । पूर जैसा ॥ २५ ॥ तैसें समविषमत्व नेणों कैचें । वांयांचि चराचर[18] रचे । पाहातां प्रसवतिया योनीचे । लक्ष दिसती ॥ २६ ॥ येरी[19] जीवभावाचिये पीलविये[20] । कांहीं मर्यादा करूं नये । पाहिजे कवण हें आघवें वियें । तंव मूळ तें शून्य[21] ॥ २७ ॥ म्हणूनि कर्ता मुद्दल न दिसे । आणि सेखीं[22] कारणही कांहीं नसे । माजि कार्यचि आपैसें । वाढोंचि लागे ॥ २८ ॥ ऐसा करितेनवीण गोचरु[23] । अव्यक्तीं हा आकारु । निपजे जो व्यापारु । तया नाम कर्म ॥ २९ ॥

**अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् ।**
**अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ ४ ॥**

**अन्वय**–[ हे ] देहभृतां वर, यः क्षरः भावः तत् अधिभूतं, पुरुषः अधिदैवतं, च अत्र देहे अधियज्ञः अहं एव [ अस्मि ]. ॥ ४ ॥

आतां अधिभूत[24] जें म्हणिपे । तेंहि सांगों संक्षेपें । तरी होय आणि हारपे[25] । अभ्र जैसें ॥ ३० ॥ तैसें असतेपण आहाच । नाहीं होइजे हें साच । जयातें रूपा आणिती पांचपांच[26] । मिळोनियां ॥ ३१ भूतातें अधिकरूनि[27] असे । आणि भूतसंयोगें तरि दिसे । जे वियोगावेळे अंशे । नामरूपादिक ॥ ३२ ॥ तयातें अधिभूत म्हणिजे । मग अधिदैवत पुरुष[28] जाणिजे । जेणें प्रकृतीचें भोगिजे । उपार्जिलें[29] ॥ ३३ ॥ जो चेतनेचा[30] चक्षु[31] । जो इंद्रियदेशींचा अध्यक्षु । जो देहास्तमानीं वृक्षु । संकल्प[32]विहंगमाचा ॥ ३४ ॥ जो परमात्माचि परि दुसरा । जे अहंकारनिद्रा निदसुरा[33] । म्हणोनि स्वप्नाचिया वोरबारा[34] । संतोषे शिणे ॥ ३५ ॥ जीव येणें नांवें । जयातें आळविजे[35] स्वभावें । तें अधिदैवत जाणावें । पंचायतनींचें[36] ॥ ॥ ३६ ॥ आतां इयेचि शरीरग्रामीं । जो शरीरभावा[37]तें उपशमी[38] । तो अधियज्ञु एथ गा मी । पंडुकुमरा ॥ ३७ ॥ येर अधिदैवाधिभूत । तेहि मीचि कीर समस्त । परि पंधरें[39] किडाळा[40] मिळत । तें काय सांकें[41] नोहे ॥ ३८ ॥ तरि तें पंधरेपण न मैळे । आणि किडाळाचियाही अंशा न मिळे । परि जंव असे तयाचेनि मेळें । तंव सांकेंचि म्हणिजे ॥ ३९ ॥ तैसें अधिभूतादि आघवें । हें अविद्येचेनि पालवें । झांकलें तंव मानावें । वेगळें ऐसें ॥ ४० ॥ तेचि अविद्येची जवनिक[42] फिटे । आणि भेदभावाची अवधी[43] तुटे । मग म्हणों एक होऊनि जरी अटे । तरी काय दोनी होती ॥ ४१ पैं केशांचा गुंडाळा । वरि

१ मरणें; लीन होणें. २ निरंतर. ३ असणारी. ४ देहांतर्गत ब्रह्म (कूटस्थ किंवा प्रत्यगात्मा.) ५ गडद ढगांचीं पटलें. ६ निराकार शुद्ध ब्रह्मांत. ७ प्रकृति, अहंकार इत्यादिकांच्या. ८ आकार. ९ कल्पनातीत शुद्ध ब्रह्माच्या. १० माळ जमिनींत. ११ मी बहुत प्रकारचा होईन ह्या संकल्पाच्या. १२ अंकुर; वाढ. १३ ॐकार. १४ ब्रह्मांड. १५ आंत पहावें तर. १६ भरणा. १७ असंख्य. १८ स्थावरजंगम विश्व. १९ इतर व्यक्ति. २० विस्तार. २१ अव्यक्त. २२ शेवटीं. २३ दिसणारा. २४ नाशवंत. २५ नाहींसें होतें. २६ पंचीकृत पंचमहाभूतें. २७ आश्रय करून. २८ जीव. २९ उत्पन्न केलें. ३० बुद्धीचा. ३१ द्रष्टा; पाहणारा. ३२ मनोरथरूप पक्ष्याचा. ३३ निजलेला. ३४ खटपट. ३५ हांक मारली. ३६ पंचमहाभूतांचें बनलेलें जें शरीर त्याचें ३७ उपाधींस. ३८ लय करतो. ३९ पंधराच्या दराचें ( उत्तम ) सोनें. ४० हिणकट सोनें. ४१ कमी योग्यतेचें. ४२ पडदा. ४३ अंतर; मर्यादा.

त्याला तें जाणत नाहीं, व तें शरीर नाश पावल्यावरही जें कधी नाश पावत नाही. १८ हे सुभद्रापति, अशा रीतीनें ज्या ब्रह्माची आपल्याच ठिकाणीं निरंतर सहज स्थिति असते, त्याला अध्यात्म असें म्हणतात. १९ मग, निर्मळ आकाशांत नानारंगांचे ढग एकदम कसे उत्पन्न होतात हें ज्याप्रमाणें कळत नाहीं, २० त्याचप्रमाणें त्या निराकार शुद्ध ब्रह्मांत प्रकृति-अहंकारादि भेदांनीं ब्रह्मांडाचे आकार होऊं लागतात. २१ परंतु कल्पनातीत शुद्धब्रह्माच्या माळ जमिनींत, मी बहुत प्रकारचा होईन अशा संकल्पाचा अंकुर उत्पन्न होऊन, त्याला लागलीच ब्रह्मांडाचे घोंडे ( आकार उत्पन्न होऊन त्यांनीं तो लवतो. २२ आकारांत पहूं लागलें म्हणजे तो त्या बीजानें म्हणजे ब्रह्मानेंच भरलेला आहे असें दिसतें; आणि त्या प्रत्येकांत किती जीव होतात व जातात याची गणना करतां येत नाहीं. २३ मग त्या ब्रह्मांडाच्या गोलाचे प्रत्येक अंशापासून असंख्यात आदिसंकल्प उत्पन्न होतात. असो; अशा रीतीनें सृष्टीचा विस्तार होतो. २४ परंतु दुसऱ्या कोणाशिवाय एकटेंच परब्रह्म सर्वत्र भरलें असून अनेकरूपानें नटून पूर आल्याप्रमाणें भासतें. २५ त्याचप्रमाणें, स्थावरजंगम विश्वाची रचना सहज होऊन त्यांत अधिकउणेपणा कसा होतो, हें समजत नाहीं; परंतु पाहूं गेलें असतां लक्षावधि जाति उत्पन्न झालेल्या दिसतात. २६ याव्यतिरिक्त, नानाप्रकारच्या जीवांच्या विस्ताराची मर्यादा करतां येत नाहीं. त्यांची कोणापासून उत्पत्ति होते हें पाहूं गेलें तर त्यांचें मूळ अव्यक्तच आहे. २७ म्हणून, मूळांत कर्त्याचा ठिकाण नसून आणि शेवटीं कांहीं कारणही नसतां मध्येंच कार्याची आपोआप वृद्धि होते. २८ अशाप्रकारें, अव्यक्ताच्या ठिकाणीं कर्त्यावांचून प्रत्यक्ष दिसणारा आकार उत्पन्न करण्याचा जो व्यापार, त्याला कर्म असें म्हणतात. २९

**हे पुरुषश्रेष्ठा, नाशवंत जो विकार त्याला अधिभूत म्हणावें; [हिरण्यगर्भ ( समष्टींतील ) आणि तैजस ( व्यष्टींतील ) असा ] पुरुष याला अधिदैवत म्हणावें; व या देहांत [केवळ साक्षित्वानें] असणाराला अधियज्ञ म्हणावें व तो मीच आहें. ॥ ४ ॥**

आतां, 'अधिभूत' ज्याला म्हणतात तें संक्षेपानें सांगतों: ज्याप्रमाणें ढग उत्पन्न होतात आणि लय पावतात, ३० त्याप्रमाणें, ज्याचें अस्तित्व लटकें असून खरोखर पाहूं गेलें असतां जें होत नाहीं व ज्याला पंचमहाभूतें एकत्र होऊन रूपाला आणतात; ३१ जें पंचमहाभूतांच्या आश्रयानें असतें, त्यांच्याच संयोगानें दृष्टीस पडतें, व विनाशकालीं लय पावतें, असें जें नांवरूप ३२ त्याला "आधिभूत" असें म्हणतात. मग अधिदैवत म्हणजे जीव असें समजावें तो प्रकृतिजन्य भोगांचा उपभोग घेतो. ३३ जो बुद्धीचा द्रष्टा, इंद्रियरूप देशाचा अधिपति, व शरीराच्या अंतकालीं मनोरथरूप पक्ष्यांचा विसावा घेण्याचा वृक्ष; ३४ जो प्रत्यक्ष दुसरा परमात्माच आहे, परंतु अहंकाररूप निद्रेंत निजल्यामुळें ज्याला स्वप्नाच्या खटपटीनें संतोष व शीणही होतो, ३५ आणि ज्याला जीव या नांवानें हांका मारतात, त्याला 'अधिदैवत' असें म्हणतात; व तो पंचमहाभूतांनीं बनलेल्या शरीरांतील मुख्य दैवत आहे. ३६ आतां, पांडुकुमरा, याच शरीररूप गांवांत जो शारीरिक उपाधींचा लय करितो, तो 'अधियज्ञ' मी होय. ३७ येरवीं, अधिदैव व आधिभूत हें सर्व खरोखर मीच आहें; परंतु उत्तम कसाचें सोनें हिणकटाला मिळविल्यावर तें डाकलग होत नाहीं का? ३८ तथापि त्याचा उत्तमपणा कमी होत नाहीं, व तें हिणकट सोन्यांतही मिळत नाहीं; परंतु जोंपर्यंत त्याच्याशीं एकत्र असतें, तोंपर्यंत त्याला डाकलगच म्हणतात; ३९ त्याचप्रमाणें, अधिभूतादि सर्व हे अज्ञानाच्या पदरानें जोंपर्यंत झांकले आहेत, तोपर्यंत वेगळे मानले पाहिजेत. ४० तोच अज्ञानाचा पदर काढून आणि भेदभावाची मर्यादा तोडून जर एकत्र करून आणले, तर ते दोन वेगळे आहेत काय? ४१ परंतु केसांची गुंडाळी करून त्यांजवर स्फटिकाची शिळा ठेव्याबर त।

ठेविली स्फटिकाशिळा । ते वरि पाहिजे डोळां । तंव भेदली[1] गमती ॥४२॥ पाठीं केश पैरौते[2] नेळे । आणि भेदलेपण काय नेणों जाहालें । तरि डांक देऊनि सांदिलें । शिळेतें काई ॥४३॥ नैा[3] ते अखंडचि आयती । परि संगें भिन्न गमली होती । ते सारिलिया मागौती । जैसी का तैसी ॥ ४४ ॥ तेवींचि अहंभावो जाये । तरी ऐक्य तें आधींचि आहे । हेंचि साचें जेथ होये । तो आधियज्ञु मी ॥ ४५ ॥ पैं गा आम्हीं तुज । सकळ यज्ञ कर्मज[4] । सांगितले जें काज । मनीं धरूनि ॥ ४६ ॥ तो हा सकळ जीवांचा विसांवा । नैष्कर्म्यसुखाचा[5] ठेवा । परि उघड करूनि पांडवा । दाविजत असे ॥ ४७ ॥ पहिलें वैराग्यइंधनें[6] परिपूर्तीं । इंद्रियानळीं प्रदीप्तीं । विषयद्रव्याचिया आहुती । देऊनियां ॥ ४८ ॥ मग वज्रासन तेचि उर्वी[7] । शोधूनि आधारमुद्रा[8] बरवी । वेदिका[9] रचे माडवीं । शरीराचा ॥ ४९ ॥ तेथ संयमाग्नीचीं[10] कुंडें । इंद्रियद्रव्याचेनि पवाडें । यजिजती उदंडें । युक्तिघोषें[11] ॥ ५०॥ मग मनप्राणसंयमु । हाचि हवनसंपदेचा संभ्रमु[12] । येणें संतोषविजे निर्धूमु । ज्ञानानळु[13] ॥ ५१ ॥ ऐसेनि हें सकळ ज्ञानीं समर्पे[14] । मग ज्ञान तें ज्ञेयीं[15] हारपे । पाठीं ज्ञेयचि स्वरूपें । निखिल उरे ॥ ५२ ॥ तया नांव गा अधियज्ञु[16] । ऐसें बोलला जंव सर्वज्ञु[17] । तंव अर्जुन अतिप्राज्ञु[18] । तया पातलें[19] तें ॥ ५३ ॥ हें जाणोनि म्हणितलें देवें । पार्था परिसतु आहासि बरवें । या कृष्णाचिया बोलासवें । येरु सुखाचा जाहला ॥ ५४ ॥ देखा बालकाचिया धणि[20] धाइजे । कां शिष्याचेनि जाहालेपणें[21] होइजे । हें सद्गुरुचि एकलेनि जाणिजे । कीं[22] प्रसवतियें[23] ॥ ५५ ॥ म्हणोनि सात्त्विक भावाची मांदी[24] । कृष्णाआंगीं अर्जुनाआधीं । न समातसे परी बुद्धी । सांवरूनि देवें ॥ ५६ ॥ मग पिकलिया सुखाचा परिमळु । कीं निवालिया अमृताचा कल्लोळु[25] । तैसा कोंवळा आणि रसाळु । बोलु बोलिला ॥ ५७ ॥ म्हणे परिसणेयांच्या[26] राया । आइकें बापा धनंजया । ऐसी जळों सरलिया माया । तेथ जाळितें[27] तेंही जळे ॥५८॥

**अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः५**

**अन्वय**–यः अंतकाले मामेव स्मरन् च कलेवरम् मुक्त्वा प्रयाति, सः मद्भावं याति, अत्र संशयः न अस्ति.५

जें आतांचि सांगितलें होतें । अगा अधियज्ञ म्हणितला जयातें । जें आधींचि तया मातें । जाणोनि अंतीं ॥ ५९ तें देह झोळें[28] ऐसें मानुनी । ठेलें आपणपें आपण होउनी । जैसा मठ गगना भरुनी । गगनींचि असे ॥ ६० ॥ ये प्रतीतीचिया माजघरीं । तया निश्चयाची ओवरी[29] । आली म्हणोनि बाहेरी । नव्हेचि से ॥ ६१ ॥ ऐसें सबाह्य ऐक्य संचलें । मीचि होऊनि असतां रचिलें । बाहेरि भूतांचीं पांचही खवळें[30] । नेणतांचि पडिलीं ॥ ६२ ॥ आतां उभयां[31] उभेपण नाहीं जयाचें । मा पडिलिया गहन[32] कवण तयाचें । म्हणोनि प्रतीतीचिये पोटींचें । पाणी न हाले ॥ ६३ ॥ ते[33] ऐक्याची आहे वोतिली । कीं नित्यतेचिया हृदयीं घातली । जैसी समरससमुद्रीं[34] धुतली । रुळेचि[35] ना ॥ ६४ ॥ पैं अथावीं[36] घट बुडाला । तो आंतबाहेरी उदकें भरला । पाठीं दैवगत्या जरी फुटला । तरी उदक काय फुटे ॥ ६५ ॥ नातरी सर्पें कवच सांडिलें । कां उबारेनें वस्त्र फेडिलें । तरी सांग पां काय मोडलें । अवेवामाजीं[37] ॥ ६६ ॥ तैसा आकार हा आहाच[38] भ्रंशे । वांचूनि वस्तु[39] ते सांचलीचि असे । तेचि बुद्धि जालिया विसुंकुसे[40] । कैसेनि[41] आतां ॥६७॥ म्हणोनि यापरी

१ फुटलीशी. २ दूर; पलीकडे. ३ नाहीं, तर. ४ कर्मापासून झालेले. ५ ब्रह्मसुख. ६ सर्पण. ७ पृथ्वी. ८ मूळबंध. ९ ओटा. १० इंद्रियनिग्रहरूप अग्नीचीं. ११ योगमंत्रानें. १२ तयारी. १३ ज्ञानरूप अग्नि. १४ अर्पण करावें. १५ ब्रह्मांत. १६ ब्रह्म. १७ सर्व जाणणारा भगवान श्रीकृष्ण. १८ महाबुद्धिमान. १९ समजलें. २० तृप्तीनें. २१ कृतार्थपणें. २२ किंवा. २३ आईनें. २४ समुदाय. २५ लाटा. २६ श्रोतृश्रेष्ठा. २७ जाळणारें [ज्ञान.] २८ मिथ्या. २९ कोठडी. ३० कवचें. ३१ उभ्या; जिवंत. ३२ संकट. ३३ ती प्रतीति. ३४ पूर्णानंदैक्यसमुद्रांत. ३५ मळेचिना. ३६ खोल पाण्यांत. ३७ अवयवांमध्यें. ३८ वरचेवर. ३९ ब्रह्म. ४० तत्पर. ४१ भय कशाचें आहे ?